# धडा पाठ 8

## असा आहे सिनेमा

भानू : हं! काय चाललं आहे बाईसाहेबांचं?

शालिनी : काही नाही. सिनेमा बघतेय.

भानू : म्हणजे आज चहा-पाण्याला सुट्टी!

शालिनी : बघा, सगळं टेबलावरच आहे. इथंच घेताय का? तुम्हीही पहा की माझ्याबरोबर! मस्त आहे सिनेमा.

भानू : म्हणजे नेहमीचा सगळा मसाला ना? मारामारी, नाचगाणी, रडारड!

शालिनी : गप्प बसा हो. नका पाहू सिनेमा पण, बडबड करू नका. सगळे संवाद जाताहेत.

भानू : बरं बुवा। पण हा हिरो असे वेडेवाकडे झटके का देतोय? अंगात बिंगात येतंय की काय?

शालिनी : तो ब्रेकडान्स आहे हो! किती मस्त नाचतोय तो! तुम्हाला काही कळत नाही. निदान गप्प बसावं. उगीच अज्ञानाचं प्रदर्शन कशाला?

भानू : नाही-नाही. मी अज्ञानाचं प्रदर्शन करत नाहीए. पण शालू, तूच बघ, एकाच गाण्यात बिचाऱ्यानं कुठं कुठं नाचावं! समुद्राच्या काठी, जंगलात, खडकांवर, बागेत! म्हणजे तीन मिनिटांतच संपूर्ण पृथ्वी प्रदक्षिणा!

शालिनी : असू दे हो, तुम्ही निसर्गाचा आनंद घ्या नं!

## ऐसी है फिल्म

भानू : हाँ, क्या हो रहा है मेमसाब?

शालिनी : कुछ नहीं। फिल्म देख रही हूँ।

भानू : यानि आज चाय पानी की छुट्टी!

शालिनी : देखो सब कुछ मेज़ पर ही है। यहीं ले रहे हैं क्या? आप भी देखिए न (फिल्म) मेरे साथ। बहुत मज़ेदार है।

भानू : यानि हमेशा की तरह मसाला (फिल्म) न? मार-पीट, नाच-गाने, रोना-धोना (आदि आदि)!

शालिनी : चुप बैठिए न। मत देखिए फिल्म पर बड़-बड़ मत कीजिए। सारे डायलॉग (निकले) जा रहे हैं।

भानू : अच्छा बाबा! लेकिन यह हीरो ऐसे आड़े-तिरछे झटके क्यों दे रहा है? इसे भूत लग गया है क्या?

शालिनी : यह ब्रेकडान्स है जी। क्या बढ़िया नाच रहा है वह। आप तो कुछ समझते नहीं। कम से कम चुप तो रहिए। बिना कारण अपने अज्ञान का प्रदर्शन किस लिए?

भानू : नही-नहीं मैं अज्ञान का प्रदर्शन नहीं कर रहा हूँ। लेकिन शालू, तुम ही देखो। एक ही गाने में उस बेचारे को कहाँ कहाँ नाचना है। समुद्र के किनारे, जंगल में, चट्टानों पर, बगीचे में! यानि तीन मिनटों में ही संपूर्ण पृथ्वी की परिक्रमा।

शालिनी : रहने भी दीजिए। आप प्रकृति का आनंद लीजिए न!

भानू : अरे। यह अकेली ही कहाँ जा रही है?

भानू : अरेच्या! ही एकटीच कुठे जातेय?

शालिनी : अयाई ग!

भानू : का ग?

शालिनी : अहो, तिकडे नेमका खलनायक आणि त्याची माणसं आहेत. ती तिची वाट बघाताहेत वाटतं! येताहेत बघा ते!

भानू : काळजी करू नकोस. तो नाचणारा हीरो येतोयच बघ आता.

शालिनी : बिचारीला कसे ओढताहेत बघा. ती रडतेय पण किती सुंदर दिसतेय नाही? रडणारी सुंदरी!

भानू : तिचा मेकप कसा जात नाही?

शालिनी : गप्प राहताय की नाही तुम्ही?

भानू : तो बघ आपला हीरो! ढिश्यूम ढिश्यूम! हा एकटाच पुरतोय बघ, त्या दहा जणांना! त्या पठ्ठ्याच्या अंगावर एक पण घाव नाहीय.

शालिनी : तुम्ही जा पाहू इथून, सगळा रंगाचा बेरंग करताहात.

भानू : बरं बाई! माझे आई! बघ तू एकटीच! मी पेपर वाचतो.

शालिनी : म्हणजे राजकारणच ना! तिथेही सिनेमाचाच मसाला! तुम्ही पेपर वाचा. मी सिनेमा बघते. दोन्ही एकच.

शालिनी : उई माँ!

भानू : क्या हुआ?

शालिनी : अजी, वहाँ तो खलनायक और उसके साथी हैं। लगता है वे उसी की ताक में हैं। देखिए वे आ रहे हैं।

भानू : चिंता मत करो। देखो वह नाचनेवाला हीरो अब आ ही रहा है।

शालिनी : बेचारी को कैसे घसीट रहे हैं, देखो। वह रो रही है। कितनी सुंदर दिख रही है, नहीं? रोनेवाली सुंदरी!

भानू : उसका मेकप कैसे जाता नहीं?

शालिनी : आप चुपभी रहते हैं या नहीं?

भानू : वह देखो अपना हीरो! ढिश्यूम-ढिश्यूम। दस आदमियों के लिए वह अकेला ही काफी है। उस पट्ठे के शरीर पर एक घाव भी नहीं है!

शालिनी : आप तो जाइए यहाँसे। सारा मज़ा किरकिरा कर रहे है।

भानू : अच्छा बाबा! श्रीमतीजी! (मेरी माँ) देखो तुम अकेले ही! मैं अखबार पढ़ता हूँ।

शालिनी : यानि राजनीति ही न? वहाँ भी तो फिल्मी मसाला ही (है)। आप अखबार पढ़िए, मैं फिल्म देखती हूँ। दोनों एक बात है।

शब्दार्थ

| | |
|---|---|
| काय चाललंय | क्या चल रहा है? |
| बघणे | देखना |
| सुट्टी | छुट्टी |
| टेबल | टेबल |
| घेणे | लेना |
| पाहणे | देखना |
| माझ्याबरोबर | हमारे साथ |

| | |
|---|---|
| मस्त | मजेदार |
| नेहमी | हमेशा |
| मारामारी | मार-पीट |
| नाचगाणी | नाच गाना |
| रडारड | रोना धोना |
| गप्प बसा | चुप बैठिए |
| जाणे | निकल जाना |
| वेडेवाकडे झटके | आड़े-तिरछे झटके |
| अंगात येणे | भूत लगना |
| मस्त नाच | अच्छा नाच |
| तुम्हाला | आप को |
| काही | कुछ |
| कळत नाही | समझता नहीं |
| निदान | कम से कम |
| बिचारा | बेचारा |
| समुद्रकाठ | समुद्र के किनारे |
| जंगल | जंगल |
| खडकांवर | चट्टानों पर |
| बागेत | बगीचे में |
| पृथ्वी प्रदक्षिणा | पृथ्वी की परिक्रमा |
| निसर्गाचा आनंद | प्रकृति का आनंद |
| एकटी | अकेली |
| वाट बघणे | बाट जोहना |
| येतोय | आ रहा है |
| ओढणे | घसीटना |
| पुरणे | काफी होना |
| पट्टा | पट्टा |
| रंगाचा बेरंग | रंग में भंग/मजा किरकिरा |
| बाई | श्रीमतीजी |
| माझे आई | मेरी माँ |
| वाचणे | पढ़ना |
| राजकारण | राजनीति |
| दोन्ही एकच | दोनों एक ही |

## अभ्यास

I नीचे दिए गए प्रश्नों के उत्तर दीजिए।

1) हिरो एकाच आम्यात कुठे कुठे नाचतो आहे?
2) सिनेमाचा "मसाला" कशाला म्हणतात? त्यात कुठल्या कुठल्या गोष्टींचा समावेश असतो?
3) हीरो काय करतो आहे? तो एकटाच किती जणांना पुरतो आहे?
4) रडणारी नायिका कशी दिसते?
5) पेपरात काय असतं?

II उदाहरण के अनुसार नीचे दिए गए वाक्यों का परिवर्तन कीजिए।

उदाहरण: बाळू अभ्यास करतो आहे.
बाळू अभ्यास करतो.

1) मी चहा घेतो आहे.
2) मी बाजारात जातो आहे.
3) आम्ही अभ्यास करतो आहोत.
4) तू पुस्तक आणते आहेस.
5) तुम्ही दोघं बागेतून फुलं आणता आहात.
6) तो सिनेमा बघतो आहे.
7) ती खोली स्वच्छ करते आहे.
8) बाबा अंगणात काम करत आहेत.
9) त्या मुली बागेतून फुलं आणत आहेत.
10) ती पिल्लं झाडाखाली बसत आहेत.
11) कुत्रं दूध पीत आहे.

III उदाहरण के अनुसार निषेधवाचक वाक्य बनाइए।

*उदाहरण:* मी सिनेमा बघते आहे.
मी सिनेमा बघत नाही.

1) मी चहा घेतो आहे.
2) आम्ही सामान टेबलावर ठेवतो आहोत.
3) तू अभ्यास करते आहेस.
4) तू खेळतो आहेस.
5) तुम्ही दोघी गाणी ऐकत आहात.
6) जोसेफ फाईल आणतो आहे.
7) प्रिया सिनेमा बघते आहे.
8) बाबा चहा घेत आहेत.
9) त्या मुली आज सहलीला जात आहेत.
10) ती पिल्लं भुंकत आहेत.

IV उदाहरण के अनुसार नीचे दिए गए निषेधवाचक वाक्यों के सकारात्मक वाक्य बनाइए।

*उदाहरण:* बाळू अभ्यास करत नाही.
बाळू अभ्यास करतो आहे.

1) मी बाजारात जात नाही आहे.
2) आम्ही सिनेमा बघत नाही आहोत.
3) तू सभेची तयारी करत नाही आहेस.
4) शांता बाहुलीशी खेळत नाही आहे.
5) तुम्ही ती फाईल आणत नाही आहात.
6) ती सहलीला येत नाही आहे.
7) प्रिया पानं गोळा करत नाही आहे.
8) बाबा प्रगतिपुस्तकांवर सही करत नाही आहेत.
9) त्या मुली डबा आणत नाही आहेत.
10) ती पिल्लं झाडाखाली बसत नाही आहेत.

V उदाहरण के अनुसार कोष्ठक में दिए गए शब्दों के उपयुक्त रूपों का प्रयोग कर वाक्य पूरे कीजिए।

*उदाहरण:* बाहुलीशी .......... मुलगी शांता आहे. (खेळणे)
बाहुलीशी खेळणारी मुलगी शांता आहे.

1) सहलीला .......... मुली सकाळी खूप लवकर येतात. (जाणे)
2) ती नाटकात काम .......... मुलं आमच्या शाळेत आहेत. (करणे)
3) ती .......... मुलं माझ्याबरोबर येताहेत. (खेळणे)
4) ती .......... मुलगी इकडे येते आहे. (गाणे)
5) तो .......... मुलगा तिचा भाऊ आहे. (पळ)
6) तिथे काम .......... कर्मचारी त्या विभागातील आहेत. (करणे)
7) ती त्या .......... पिल्लाची आई आहे. (ओरडणे)
8) ती वाट .......... माणसे खलनायकाची आहेत. (बघणे)
9) तो .......... माणूस हीरो आहे. (य़ेणे)
10) ती .......... हिरॉईन किती सुंदर दिसतेय! (रडणे)

VI उदाहरण के अनुसार कोष्ठक में दिए गए शब्दों के उपयुक्त रूपों का प्रयोग कर वाक्य पूरे कीजिए।

1. *उदाहरण:* एक गाण्यात बिचाऱ्यानं किती ........... (नाचणे)
एका गाण्यात बिचाऱ्यानं किती नाचावं!

1) सुधानं सामान आणण्यासाठी बाजारात किती वेळा .......... .(जाणे)
2) अहवालास अंतिम रूप देण्यासाठी सर्व कर्मचाऱ्यांची किती वेळा मीटिंग .......... (बोलावणे)
3) त्रैमासिक मीटिंगबद्दल सर्वांना किती परिपत्रकं .......... (पाठविणे).

4) फुलं गोळा करण्यासाठी बागेत किती वेळा .......... (जाणे).

2. *उदाहरण:* प्रगतिपुस्तकावर बाबांनी सही .......... लागते. (करणे)
प्रगतिपुस्तकावर बाबांनी सही करावी लागते.

1) दुसरी राज्यभाषा शिकविण्यासाठी सरकारला योजना .... लागतात. (आखणे)
2) बाळासाठी दूध .......... लागते. (आणणे)
3) तुझ्यासाठी मला सिनेमा .......... लागतो. (बघणे)
4) माझ्या बहिणीला खाऊ .......... लागतो. (देणे)
5) मंगळागौरीसाठी माझ्या मैत्रिणींना .......... लागते. (बोलावणे)

VII उदाहरण के अनुसार नीचे दिए गए वाक्यों का परिवर्तन कीजिए।
*उदाहरण:* त्याच्या अंगावर एक घाव पण नाही आहे.
त्याच्या अंगावर एकपण घाव नाहीय.

1) हिरो गुंडाना खूप मारतो आहे.
2) ती मघापासून पुस्तक शोधते आहे.
3) ती पानं गोळा करते आहे.

VIII उदाहरण के अनुसार कोष्ठक में दिए गए शब्दों का उपयुक्त रूप भरकर वाक्य पूरे कीजिए।
*उदाहरण:* संध्याकाळी मुलांनी खेळावं.
संध्याकाळी मुलांनी ........... (झोप-)
संध्याकाळी मुलांनी झोपू नये.

1) मुलांनी लवकर उठावं उशिरापर्यंत .......... . (झोप-)
2) आजोबांनी मुलांबरोबर खेळावं. आजोबांनी मुलांना .......... . (रागाव)
3) बाबांनी आईला मदत करावी. नुसताच हुकुम .......... . (सोड-)
4) मुलांनी हसतमुख असावं. सारखं .......... . (रड-)
5) खलनायकानं नायिकेला छळावं. नायकानं .......... . (छळ-)

IX उपयुक्त क्रिया-रूपों का प्रयोग कर अनुच्छेद पूरा कीजिए।
आज सकाळपासून सगळे आपापल्या कामात .......... . राम अभ्यास .......... .......... . आई स्वयंपाक .......... .......... . माधव, राजीव आणि सुधा घर साफ ......... .......... . बाबा पत्र .......... .......... . रमा पुस्तक .......... .......... . प्रत्येकजण कशासाठी तरी आईला हाक .......... .......... . आईनं काय .......... आणि काय .......... ..........? कुणाला मदत .......... आणि कुणाला .......... ..........? काम .......... आई एकटी आणि हाका .......... अनेक!

पढ़िए और समझिए

## भारतीय चित्रपट

हल्ली भारतीय भाषांमध्ये खूप चांगले चित्रपट तयार होत आहेत. मल्याळम्, कन्नड, बंगाली, तेलुगु या भाषांमधले चित्रपट सर्व भारतीय पाहत आहेत. हिंदी चित्रपटांना तर भारतात आणि भारताबाहेरही खूप मागणी येत आहे. नवनवीन कलाकार उदयाला येत आहेत. जुने मावळत आहेत. काही जुन्या नटनट्या अजूनही जोमाने काम करत आहेत.

चित्रपटांची केवळ संख्याच वाढत आहे असे नाही. त्यांचा दर्जाही उंचावतो आहे. काही वेचक कलाकार भारतीय जीवनातील जिवंत समस्यांवर कलात्मक चित्रपट काढत आहेत. दिग्दर्शक नवनवीन विषय हाताळत आहेत. अद्ययावत तंत्र वापरत आहेत.

साऱ्या जगभर भारतीय चित्रपटांचा एक खास प्रेक्षकवर्ग तयार होत आहे. राजकपूरची वाहवा अजूनही परदेशात होत आहे. मंगेशकर भगिनींचा चाहता वर्ग वाढतोच आहे. आपल्यात आज सत्यजित राय यांच्यासारखा विश्वविख्यात विशेष ऑस्करविजेताही आहे.

एकीकडे भारतीय चित्रपट दर्जेदार बनत आहे. दुसरीकडे सर्वसामान्य माणसाला मात्र मसाला चित्रपटाचेच आकर्षण आहे. त्यामुळे मसाला चित्रपट फार मोठ्या संख्येने भारतात तयार होत आहेत.

### शब्दार्थ

| | |
|---|---|
| हल्ली | आजकल |
| खूप | खूब |
| चांगले | अच्छे |
| चित्रपट | चित्रपट, फिल्म |
| तयार होणे | तैयार होना |
| भाषांमधले | भाषाओं में |
| नवनवीन | नई-नई |
| उदयाला येणे | उदित होना |
| मावळणे | अस्त होना |
| जुन्या | पुराने |
| जोम | जोश |
| केवळ | केवल |
| संख्या | संख्या, अंक |
| दर्जा | दर्जा, श्रेणी |
| उंचावणे | उठाना |
| वेचक | चुने हुए |
| जिवंत समस्या | ज्वलंत समस्या |

| | |
|---|---|
| हाताळणे | निबटाना |
| अद्ययावत | अद्यतन |
| तंत्र | तंत्र |
| वापरणे | प्रयोग करना |
| जगभर | दुनिया भर |
| खास | खास |
| प्रेक्षक | दर्शक |
| वाहवा | वाह-वाह |
| चाहता वर्ग | प्रशंसक |
| वाढणे | बढ़ना |
| विजेता | विजेता |
| एकीकडे | एक तरफ़,एक ओर |
| सर्वसामान्य | जन साधारण |
| आकर्षण | आकर्षण |
| फार मोठ्या संख्येने | बहुत अधिक संख्या में |

## अभ्यास

I अनुच्छेद के आधार पर नीचे दिए गए प्रश्नों के उत्तर दीजिए।

1) भारतात कोणकोणत्या भाषेतील चित्रपट तयार होतात?
2) भारताबाहेर कोणत्या भाषेच्या चित्रपटांना अधिक मागणी आहे?
3) चित्रपट सृष्टीतील विश्वविख्यात व्यक्ती कोण कोण आहेत?
4) भारतात मसाला चित्रपट मोठ्या प्रमाणात निर्माण होण्याचे कारण काय?

II हिंदी में जिस तरह 'वा' का प्रयोग करके 'चाय वाय, पानी वानी' जैसे शब्द युग्म बनते हैं उसी तरह मराठी में 'बि' का प्रयोग होता है जैसे 'चहाबिहा, पाणीबिणी' इत्यादि। इसे ठीक तरह से समझिए और नीचे दिए गए शब्दों से इसी तरह शब्दयुग्म बनाइए।

पानं, फळं, झाडं, सिनेमा, नाच

III 'पुरणे' इस क्रिया के दो अर्थ होते हैं।

*उदाहरण:* 1) इतके लाडू पाच जणांना पुरतात.
(इतने लड्डू पाँच लोगों के लिए काफ़ी हैं।)
एकटा हिरो दहा जणांना पुरतो.
(अकेला हीरो दस लोगों के लिए काफ़ी है।)

2) खलनायक जमिनीत खजिना पुरतो.
(खल नायक खज़ाने को जमीन में गाड़ देता है।)

इसी तरह दो भिन्न अर्थ देनेवाले और दो-दो वाक्य बनाइए।

V 'जगभर' भारतीय चित्रपटांचा प्रेक्षकवर्ग आहे. इसी तरह घरभर, गावभर, देशभर शब्दों का प्रयोग कर वाक्य बनाइए।

VI सिनेमाचा दर्जा उंचावत आहे.
सिनेमा दर्जेदार होत आहे.

तिच्या डोळयात पाणी (तेज) आहे.
तिचे डोळे पाणीदार आहेत.

उपर्युक्त वाक्य जोड़ियों के अर्थ में समानता है। 'दार' प्रत्यय लगा कर बने वाक्य का भी यही अर्थ है। इसी तरह 'डेरेदार', 'समजूतदार', 'मजेदार' इन शब्दों का प्रयोग कर वाक्य बनाइए।

VII हिंदी में अनुवाद कीजिए।

मराठी माणूस आजही संगीत नाटक पाहातो. आजकाल अनेक नवनवे चित्रपट येत आहेत. तरीही तो संगीत नाटकं पाहातो आहे. कारण संगीत नाटक हा मराठी माणसाचा आवडीचा विषय आहे. या संगीत नाटकांत गाणाऱ्या, नाचणाऱ्या नटनट्या आहेत. उत्तम संगीत देणारे संगीतकारही आहेत. या नाटकांतील संवादां-इतकीच गाणीही प्रसिद्ध आहेत. नटनट्यांबरोबरच गायक-वादकही रंगमंचावर येतात. संगीत नाटकाच्या क्षेत्रात अनेक नवे कलाकार उदयाला येत आहेत. नाटककार नाटकांत नवनवीन विषय हाताळत आहेत. म्हणूनच संगीत नाटकाचा विस्तार आणि विकास होतो आहे. प्रत्येकालाच संगीत नाटक आवडत नाही. तरीही, मराठी संगीत नाटक ही महाराष्ट्राची एक विशेषता आहे.

VIII मराठी में अनुवाद कीजिए।

आजकल बैंगलोर में फिल्म समारोह चल रहा है। इस में देश-विदेश की फिल्में दिखाते हैं। सभी जगह इन फिल्मों की चर्चा हो रही है। फिल्में देखने के लिए लोग उमड़ रहे हैं। इस के कारण टिकट की कालाबाजारी हो रही है।

IX आप मित्र के साथ सिनेमा देख रहे हैं। फिल्म देखते हुए उसके बारे में बातें करते हैं। इस बारे में आठ-दस वाक्यों का एक अनुच्छेद मराठी में लिखिए।

## टिप्पणियाँ

I इस पाठ में अपूर्ण वर्तमान काल के क्रियावाले वाक्यों का परिचय दिया गया है।

*उदाहरण:*

| | | |
|---|---|---|
| 1) | मी सिनेमा बघते आहे. | मैं सिनेमा देख रही हूँ। |
| 2) | मी पेपर वाचतो आहे. | मैं अखबार पढ़ रहा हूँ। |
| 3) | आम्ही सिनेमा बघतो आहोत. | हम सिनेमा देख रहे हैं। |
| 4) | आपण सिनेमा बघतो आहोत. | हम सिनेमा देख रहे हैं। |
| 5) | तू सुंदर दिसतो आहेस. | तुम सुंदर दिख रहे हो। |
| 6) | तू सुंदर दिसते आहेस. | तुम सुंदर दिख रही हो। |
| 7) | तुम्ही पेपर वाचता आहात. | आप अखबार पढ़ रहे हैं। |
| 8) | तो मस्त नाचतो आहे. | वह बढ़िया नाचता है। |
| 9) | ती रडते आहे. | वह रो रही है। |
| 10) | ती तिची वाट बघत आहेत. | वे उसकी राह देख रहे हैं। |

ध्यान दीजिए कि मराठी में अपूर्ण वर्तमानकाल में वर्तमान कालिक क्रियारूपों के बाद योजक क्रिया के विविध रूपों का प्रयोग पुरुष, लिंग, वचन के अनुसार होता है। उदाहरणार्थ 'बस' मूल क्रिया के विविध अपूर्ण वर्तमान कालिक रूप पुरुष, वचन, लिंगानुसार नीचे दिए गए हैं।

बस

| | | *एकवचन* | | *बहुवचन* | |
|---|---|---|---|---|---|
| *उ.पु.* | *(पु.)* | मी बसतो आहे. | मैं बैठ रहा हूँ। | आम्ही } | बसत आहोत. |
| | *(स्त्री.)* | मी बसते आहे. | मैं बैठ रही हूँ। | आपण } | हम बैठ रहे हैं। |
| *म.पु.* | *(पु.)* | तू बसतो आहेस. | तुम बैठ रहे हो। | तुम्ही } | बसत आहात. |
| | *(स्त्री.)* | तू बसते आहेस. | तुम बैठ रही हो। | आपण } | आप बैठ रहे/रही हैं। |
| *अ.पु.* | *(पु.)* | तो बसतो आहे. | वह बैठ रहा है। | ते बसत आहेत. | वे बैठ रहे हैं। |
| | *(स्त्री.)* | ती बसते आहे. | वह बैठ रही है। | त्या बसत आहेत. | वे बैठ रही हैं। |
| | *(नपुं.)* | ते बसतं आहे. | | ती बसत आहेत. | |

II अपूर्ण वर्तमान कालिक क्रियारूपों के निषेधवाचक रूपों का परिचय नीचे दिया गया है।

| | | |
|---|---|---|
| 1) | ती पेपर वाचत नाही आहे. | वह अखबार नहीं पढ़ रही है। |
| 2) | तो सिनेमा बघत नाही आहे. | वह सिनेमा नहीं देख रहा है। |

अपूर्ण वर्तमानकालिक वाक्यों को निषेध वाचक बनाने के लिए साधारण वर्तमान कालिक निषेधवाचक रूपों के बाद 'आहे' के उपयुक्त रूप जोड़े जाते हैं।

| | एकवचन | बहुवचन |
|---|---|---|
| *उ.पु.* | मी बसत नाही आहे. | आम्ही/आपण बसत नाही आहोत. |
| | मैं बैठ नहीं रहा हूँ। | हम बैठ नहीं रहे हैं। |
| *म.पु.* | तू बसत नाही आहेस. | तुम्ही/आपण बसत नाही आहात. |
| | तुम बैठ नहीं रही हो/रहे हो। | आप बैठ नहीं रहे हैं। |
| *अ.पु.* | तो/ती/ते बसत नाही आहे. | ते/त्या/ती बसत नाही आहेत. |
| | वह बैठ नहीं रहा/रही है। | वे बैठ नहीं रहा/रही हैं। |

III अपूर्ण वर्तमान कालिक क्रिया रूप संभाषण में प्रायः संक्षिप्त हो जाते हैं।

1) मी सिनेमा बघतेय. मैं सिनेमा देख रही हूँ।
2) ती कुठे जातेय? वह कहाँ जा रही है।

संक्षिप्त अपूर्ण वर्तमान कालिक क्रियारूप में 'आहे' के स्थान पर 'य' जुड़ जाता है।

| | | एकवचन | | बहुवचन | |
|---|---|---|---|---|---|
| *उ.पु.* | *(पु).* | मी बसतोय. | मैं बैठ रहा हूँ। | आम्ही | बसताय. |
| | *(स्त्री.)* | मी बसतेय. | मैं बैठ रही हूँ। | आपण | हम बैठ रहे हैं। |
| *म.पु.* | *(पु.)* | तू बसतोयस. | तु बैठ रहे हो। | तुम्ही | बसताय. |
| | *(स्त्री.)* | तू बसतेयस. | तुम बैठ रही हो। | आपण | बसताहात. |
| | | | | | आप बैठ रही/रहे हैं। |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| *अ.पु.* | *(पु.)* | तो बसतोय. | वह बैठ रहा है। | ते बसतायत. | वे बैठ रहे हैं। |
| | *(स्त्री.)* | ती बसतेय. | वह बैठ रही है। | त्या बसतायत. | वे बैठ रही हैं। |
| | *(नपुं.)* | ते बसतंय. | | ती बसतायत. | |

IV अपूर्ण वर्तमान कालिक क्रियारूपों के निषेधवाचक रूपों का भी संभाषण में प्रायः संक्षिप्त रूप हो जाता है।

1) ती वाट बघत नाहीए. वह रास्ता नहीं देख रही है।
2) तिचा मेकप जात नाहीए. उसका मेक-अप नहीं जा रहा है।

अपूर्ण वर्तमान कालिक निषेधवाचक क्रिया रूपों के संक्षिप्त रूपों में 'आहे' के स्थान पर 'ए' जुड़ जाता है।

| | एकवचन | बहुवचन |
|---|---|---|
| *उ.पु.* | मी बसत नाहीए/नाईए. | आम्ही/आपण बसत नाहीओत/नाईओत. |
| | मैं नहीं बैठ रहा/रही हूँ। | हम नहीं बैठ रहे हैं। |

| | | |
|---|---|---|
| *म.पु.* | तू बसत नाहीएस/नाईएस. | तुम्ही/आपण बसत नाहीआत/नाईआत. |
| | तुम नहीं बैठ रही/रहे हो। आप नहीं बैठ रहे/रही हैं। | |
| *अ.पु.* | तो/ती/ते बसत नाहीए/नाईए. | ते/त्या/ती बसत नाहीएत/नाईएत. |
| | वह नहीं बैठ रही/रहा है। | वे नहीं बैठ रही/रहे हैं। |

V मराठी के "पाहिजे"/"हवा" (चाहिए) क्रियारूप के अर्थ में कभी कभी अन्यपुरुष बहुवचन आज्ञावाचक क्रियारूप का प्रयोग किया जाता हैं।

1) गप्प बसावं. चुप बैठना चाहिए।
2) समोर आहे ते खावं. जो सामने है, वह खाना-चाहिए।

इस प्रकार के क्रियारूप बनाने के लिए अन्यपुरुष बहुवचन के आज्ञावाचक रूप में "आवं" जुड़ जाता है। इस के रूप में लिंग, वचन, पुरुष आदि के कारण कोई परिवर्तन नही होता।

उपर्युक्त क्रियारूपों के निषेधवाचक रूप के लिए मूल क्रियारूप में 'ऊ' लगाकर 'नये' जोड़ते हैं। इस प्रयोग में भी लिंग, वचन, पुरुष आदि के कारण कोई परिवर्तन नहीं होता।

| | | |
|---|---|---|
| उदहारण: | बसू नये. | न बैठें। |
| | नाचू नये. | नाचें नहीं। |

VI मराठी में क्रिया करनेवालों के अर्थ में क्रिया के मूलरूप के बाद '-णारा' प्रत्यय जोड़कर कृदन्त विशेषण बनता है। नीचे दिए गए वाक्यों में रेखांकित शब्दों की ओर ध्यान दीजिए।

नाचणारा हीरो येतोय. नाचनेवाला नायक आ रहा है।
रडणारी नायिका सुंदर दिसते. रोती हुई नायिका सुंदर दिखती है।

क्रिया के मूल रूप के साथ "-णारा" जोड़ कर संज्ञा शब्द भी बनाए जाते हैं।

VII "पुरणे" इस क्रिया के मराठी में नीचे लिखे गए दो अर्थ होते हैं।

1) एकटा हीरो दहा जणांना पुरतो.
अकेला नायक दस लोगों के लिए काफी है।
2) खलनायक जमिनीत खजिना पुरतो.
खलनायक जमीन में खज़ाना गाड़ता है।

VIII मराठी में "भर" शब्द स्थानवाचक शब्द में जुड़कर "पूरे" का अर्थ प्रकट करता है।

*उदाहरण:* घरभर, गावभर, देशभर

IX मराठी में "-दार" प्रत्यय शब्दों में जुड़कर "से भरा हुआ" अर्थ व्यक्त करनेवाला विशेषरूप बनाता है।

| | | |
|---|---|---|
| उदाहरम: | दर्जा + दार | = दर्जेदार |
| | पाणी (तेज) + दार | = पाणीदार |
| | मजा + दार | = मजेदार |

X निम्न लिखित वाक्य में रेखांकित शब्द पर ध्यान दीजिए।

ती तिची वाट बघताहेत वाटतं.

यहाँ 'वाटतं' का अर्थ "ऐसा लग रहा है" है। ध्यान दीजिए कि "वाटतं" में लिंग, वचन, पुरुष के अनुसार कोई परिवर्तन नहीं होता। 'वाटतं" का प्रयोग संभाव्यता दर्शाने के लिए होता है।

किसी भी वाक्य में "वाटतं" लगा सकते हैं और इस प्रयोग में वक्ता अपने कथन की वास्तविकता की पूरी जिम्मेदारी स्वयं नहीं लेता है।

# धडा
# पाठ 9

## लग्नाची मुलगी

यशवंतराव : काय वसंतराव तुमची सुमन कुठं आहे? अलिकडे दिसत नाही कुठं?

वसंतराव : ती साताऱ्याला असते. सारखी येत जात असते.

यशवंतराव : साताऱ्याला भयंकर उन्हाळा पडत असतो ना?

वसंतराव : अहो, पोटासाठी दाही दिशा!

यशवंतराव : साताऱ्याला कुठेशी असते? स्त्रियांच्या वसतिगृहात की कुणा नातेवाईकाकडे?

वसंतराव : तिच्या मामांकडे राहात असते. तिचे मामा तिथल्या एका बँकेत आहेत. त्यांची दोन्ही मुलं, सुना आणि नातवंडंही त्यांच्याजवळच राहतात. घर खूप मोठं आहे. सुमन तिथंच राहात असते.

यशवंतराव : सुमनचं वय बावीस तेवीस आहे ना?

वसंतराव : छे! ती तर फक्त विशीची आहे.

यशवंतराव : मग तिचे हात पिवळे कधी करताय? लग्नाचा विचार आहे की नाही? माझ्याकडे एक छानसा मुलगा आहे. इथेच कोल्हापुरात असतो. बँकेत नोकरी आहे. स्वतःचं घर आहे. वडील सरकारी नोकरीत आहेत. दोन बहिणी आहेत. त्या आपापल्या संसारात सुखी

आहेत. मुलगा एकटाच! वय आहे

## विवाह योग्य कन्या

यशवंतराव : क्यों वसंतराव आपकी सुमन कहाँ है? आजकल दिख नही रही?

वसंतराव : वह सातारा में रहती है। लगातार आती-जाती रहती है।

यशवंतराव : सातारा में तो भयंकर गर्मी पड़ती है न?

वसंतराव : अजी। रोजी-रोटी के लिए भटकना ही पड़ता है।

यशवंतराव : सातारा में कहाँ रहती है? महिलाओं के आवास-गृह में या किसी रिश्तेदार के यहाँ?

वसंतराव : अपने मामाके यहाँ रहती है। उसके मामा वहाँ के एक बैंक में हैं। उनके दोनों बेटे, बहुएँ, और पोते-पोतियाँ भी उनके साथ ही रहते हैं। मकान काफी बड़ा है। सुमन वहीं रहती है।

यशवंतराव : सुमन की उम्र बाईस-तेईस साल तो है न?

वसंतराव : अरे नहीं, वह तो सिर्फ बीस की है।

यशवंतराव : फिर उसके हाथ कब पीले कर रहे हैं? शादी का विचार है कि नहीं? मेरी जानकारी में एक अच्छा सा लड़का है। यहीं कोल्हापूर में रहता है। बैंक की नौकरी है। खुद का अपना मकान है। पिता सरकारी नौकरी में हैं। दो बहनें हैं। अपनी अपनी घर-गृहस्थी

पंचवीस सव्वीस. एम.कॉम. आहे.

वसंतराव : स्थळ तर चांगलंच आहे. तुमच्या माहितीचं आहे. तुम्ही आमचे घनिष्ठ मित्र आहात. माझी मुलगी म्हणजे तुमचीच मुलगी. पण घाईगर्दीत काही करणे ठीक नाही, असं माझं मत आहे.

यशवंतराव : ठीक आहे ते! घाई नकोच.

वसंतराव : तुम्ही इथंच आहात. सुमनही येत असते. मुलगाही इथंच आहे. आजकाल तरुणांना स्वतंत्र विचार असतात. त्यांची मतं ठाम असतात. प्रत्येकाच्या आवडी निवडी असतात. आपलं काम फक्त त्या दोघांना एकत्र आणणं. निर्णय त्यांना घेऊ दे.

यशवंतराव : ते स्वातंत्र्य त्यांना आहेच. ठीक आहे. तसंच करू या. येतो मी. मला थोडं जरुरीचं काम आहे.

में सुखी हैं। लड़का अकेला ही है। उम्र है पच्चीस-छब्बीस! एम्.कॉम. है।

वसंतराव : रिश्ता तो अच्छा ही है। आपकी जान पहचान का (भी) है। आप हमारे घनिष्ठ मित्र हैं। मेरी बेटी यानि आपकी बेटी। पर मेरे विचार में जल्दबाजी करना ठीक नहीं है।

यशवंतराव : वह ठीक है। जल्दबाजी नहीं चाहिए।

वसंतराव : आप यहीं हैं। सुमन भी आती रहती है। लड़का भी यहीं है। आजकल नौजवान स्वतंत्र विचारों के होते हैं। अपने विचारों पर अचल रहते हैं। हरेक की अपनी पसंद-नापसंद होती है। हमारा काम सिर्फ उन दोनों को मिलाना है। निर्णय उन्हें करने दो।

यशवंतराव : उतनी स्वतंत्रता उन्हें है ही। ठीक है। वैसा ही करें। अब मैं चलता हूँ। थोड़ा जरुरी काम है।

शब्दार्थ

| | |
|---|---|
| दिसणे | दिखाई देना |
| भयंकर | भयंकर |
| उन्हाळा | गर्मी |
| पोटासाठी दाही दिशा | रोजी-रोटी के लिए कहीं भी जाना |
| कुठे | कहाँ |
| नातेवाईक | रिश्तेदार |
| नातवंडे | पोते-पोतियाँ |
| खूप मोठं | काफी बड़ा |
| वय | उम्र, आयु |
| हात पिवळे करणे | हाथ पीले करना |
| स्वतःचं | खुद का, अपना |
| बहिणी | बहनें |
| संसार | घर-गृहस्थी |
| एकटाच | अकेला |

| | |
|---|---|
| स्थळ | रिश्ता |
| माहितीचे | पहचान का |
| मुलगी | बेटी |
| घाईगर्दी | जल्दबाजी |
| मत | विचार |
| तरुण | युवा |
| स्वतंत्र विचार असणे | सोचने का अपना ही तरीका |
| ठाम | दृढ़ |
| आवडनिवड | अपनी पसंद |
| एकत्र आणणे | मिलाना |

## अभ्यास

I नीचे दिए गए प्रश्नों के उत्तर दीजिए।

1) सुमन साताऱ्याला कुठे राहते?
2) सुमनचे मामा कुठे काम करतात? त्यांच्याजवळ कोण कोण राहतं?
3) वसंतरावांचे घनिष्ठ मित्र कोण आहेत?
4) "लग्न करून देणे" या अर्थाच्या कोणत्या वाक्प्रचाराचा उपयोग पाठात केला आहे?
5) आजकालच्या तरुण पिढीबद्दल काय म्हटलं आहे?

II कोष्ठक में दिए गए क्रियारूपों में से उपयुक्त क्रियारूप चुनकर वाक्य पूरे कीजिए। (असतो, असते, असतात)

1. 1) शांता साताऱ्याला वसतिगृहात .......... .
   2) मी दुपारी घरीच ........ .
   3) बाबा संध्याकाळी बागेत ........ .
   4) प्रिया आणि सुचेता सकाळी अभ्यासाच्या खोलीत ......... .
   5) उमेश सकाळ संध्याकाळ दुकानात ........ .
2. 1) मुलांना स्वतंत्र विचार ......... .
   2) मुलांना आपापली आवड निवड ......... .
   3) शाळांना उन्हाळ्यात सुट्या ......... .
   4) मंगळागौर श्रावणात ........ .
   5) पावसाळ्यात घाट हिरवागार ....... .
3. 1) गुंटूर मिरची तिखट .......... .
   2) पटना मिरची कमी तिखट ......... .
   3) गुलाबाची फुले अनेक रंगांची ........... .
   4) दूध पांढरे .......... .

5) मिरची लाल ......... .
6) मोगऱ्याचे फूल पांढरे .......... .

III उदाहरण के अनुसार अर्थ न बदलते हुए वाक्यों का परिवर्तन कीजिए।

उदाहरण: मुलांनी सकाळी लवकर उठावं.
मुलांनी सकाळी उशिरा उठू नये.

1) विद्यार्थांनी अभ्यास करावा.
विद्यार्थ्यांनी अभ्यासाकडे ........ . (दुर्लक्ष)
2) कर्मचाऱ्यांनी काम करावं.
कर्मचाऱ्यांनी कामात ........ . (आळस)
3) मुलांनी शाळेत खेळ खेळावे.
मुलांनी शाळेत ........ . (भांडण)
4) वर्गात शांतता पाळावी.
वर्गात ........ . (दंगा)

IV "आहे" और "अस" का उपयुक्त प्रयोग कर उदाहरण के अनुसार वाक्य पूरे कीजिए।

उदाहरण: सुमन साताऱ्याला असते.
सुमन सध्या पुण्याला आहे.

1) सभा नेहमी सभागृहातच ........ .
आजची सभा सचिवांच्या खोलीत ........ .
2) त्या झाडाला नेहमी भरपूर फुले ........ .
आज एकच फूल ........ .
3) ह्या गुलाबाची फुलं मोठी ........ .
हे फूल छोटं ........ .
4) गुंटूर मिरच्या तिखट ........ .
ही मिरची तिखट ........ .
5) रामू रोज ह्यावेळी दुकानात ........ .
आज तो घरी ........ .

V उदाहरण के अनुसार कोष्ठक में दिए गए शब्दों का प्रयोग कर निषेधवाचक वाक्य बनाइए।

उदाहरण: मिरचीचा रंग लाल असतो. (निळा)
मिरचीचा रंग निळा नसतो.

1) त्या झाडाची फुले गुलाबी असतात / ........ (पिवळी)
2) मिरची तिखट असते / ........ (गोड)
3) मोगऱ्याची फुले पांढरीशुभ्र असतात. ........ (लालभडक)

4) वडाचं झाड डेरेदार असतं. ........ (उघडंबोडकं)
5) कावळा काळा असतो. ........ (हिरवा)

VI दिए गए वाक्यांशों का सही मिलान कर वाक्य बनाइए।

| | |
|---|---|
| पारिजातकाचं फूल | पांढरा असतो. |
| झाडाची सावली | सोपा आहे. |
| हा खेळ खूप | मारामारी असते. |
| मोगऱ्याचा रंग | खूप धबधबे आहेत. |
| सिनेमात खूप | काळं नसतं. |
| त्या ठिकाणी | थंडगार असते. |

VII उदाहरण के अनुसार कोष्ठक में दिए गए शब्दों में से उपयुक्त शब्द चुनकर वाक्य पूरे कीजिए।

उदाहरण: सुधा साताऱ्याला ........ . (असते, आहेस, असतात, होते)
सुधा साताऱ्याला असते.

1) बाळू दुपारी शाळेत ........ . (नाहीस, होतास, असतो, नसते)
2) सुधा ह्यावेळी घरी ........ . (असतो, नसते, आहेस, असतात)
3) बाबा पेपर वाचत ........ . (नसते, असतो, असतात, नाहीस)
4) आज तू दुपारी घरी ........ का? (असतात, नाहीस, होते)
5) तू रोज दुकानात ........ ना? (असतात, असतेस, नाहीस, होतो)
6) तुम्ही या वेळी बागेत ........ का? (असते, नाहीस, असता, असतो)
7) सकाळी पेपर येतो तेव्हा आम्ही पूजा करत ........ . (आहेस, असते, नाहीस, असतो)

VIII "जा" या "अस" क्रियाओं के उपयुक्त रूप लगाकर वाक्य पूरे कीजिए।

1) सुधा बाजारात .........
2) उमेश सहलीला ........ .
3) बाबा पेपर वाचत ........ .
4) त्या सकाळी बागेत ........ .
5) तू अभ्यास करत ........ .
6) तू दुपारी घरी ........ .
7) तुम्ही रात्री अभ्यास करत ........ .
8) तुम्ही सकाळी देवळात जात ........ .
9) आम्ही सकाळी देवळात जात ........ .
10) आपण ह्यावेळी कुठे ........ .

IX उदाहरण के अनुसार वाक्यों में रेखांकित किए गए शब्दों के स्थान पर कोष्ठक में दिए गए शब्दों का प्रयोग कर दो-दो वाक्य बनाइए।

उदाहरण: मी दुपारी शाळेत असतो. (घर) (ऑफिस)
मी दुपारी घरात असतो.
मी दुपारी ऑफिसात असतो.

1) आपण/आम्ही दुपारी दुकानात असतो. (शाळा) (घर)
2) तू दुपारी शाळेत असतोस. (घर) (ग्रंथालय)
3) तू दुपारी घरी असतेस. (शाळा) (देऊळ)
4) आपण/तुम्ही दुपारी शाळेत असता. (ऑफिस) (घर)
5) राम दुपारी शाळेत असतो. (घर) (ऑफिस)
6) सीता दुपारी घरी असते. (मंडई) (ऑफिस)
7) रामभाऊ दुपारी घरी असतात. (देऊळ) (दुकान)
8) सीताबाई दुपारी घरी असतात. (देऊळ) (शाळा)

X उदाहरण के अनुसार दिए गए वाक्यों का परिवर्तन कीजिए।

उदाहरण: मी सारखा पुस्तक वाचत असतो.
मी पुस्तक वाचतो.

1) मी सारखी काम करत असते.
2) आम्ही दर सुटीत गावाला जात असतो.
3) तू नेहमी खोटं बोलत असतोस.
4) तू नेहमी उशिरा येत असतेस.
5) सीता सारखी रडत असते.
6) रामभाऊ सारखे वाचत असतात.
7) सीताबाई नेहमी हसत असतात.
8) मुली नेहमी अभ्यास करत असतात.
9) मुलं नेहमी दंगा करत असतात.

XI कोष्ठक में दिए गए शब्दों के उपयुक्त रूपों का प्रयोग कर अनुच्छेद पूरे कीजिए।

1) पुण्यात एक टेकडी ........ (आहे). तिला पर्वती ........ (म्हण). पर्वतीवर सकाळी खूप गर्दी ........ (असणे). काही लोक ........ (चढ), काही लोक ........ (उतर). मुलं व्यायाम ........ ........ (कर + अस), काही मुली फुलपाखरं ........ ........ (पकड + अस). काही बायका देवळात ........ ........ (जा + अस).
2) घरात लग्नाची मुलगी ........ (आहे). पण कुणाचं लक्षच ........ (नाही). मला खूप स्थळं माहीत ........ (आहे). पण कुणाला उंच मुलगा हवा ........ (आहे) तर कुणाला गोरी मुलगी हवी ........ (आहे). मला बरेचजण ........ ........

(विचार). पण काय करू? आमच्या अशोकला फक्त हुशार मुलगी हवी ........ (आहे). नोकरी करणारी मुलगी हवी ........ (आहे).

XII नीचे दिए गए संवादों के प्रश्न या उत्तर लिख कर वार्तालाप पूरा कीजिए।

वसंत - अलिकडे दिसत नाहीस कुठे?
आनंद - .................... .
वसंत - मग कुठे असतोस?
आनंद - .......................... .
वसंत - मुंबईत तुझं घर कुठे आहे?
आनंद - ................................ .
वसंत - मुलुंडला माझी मावशीही आहे.
आनंद - .................................... .
वसंत - तिच्या घरी ती, तिचे यजमान आणि दोन मुली असतात.
आनंद - ................................................................ .
वसंत - तुझ्या मुलीं एवढ्याच!
आनंद - ......................... .
वसंत - बालभवनमध्ये शिकत आहेत.
आनंद - ................................ .
वसंत - तर नक्कीच जा तिच्याकडे! तुझ्या मुलींना घेऊन!

पढ़िए और समझिए

पुणे तेथे काय उणे!

पुण्यात नेहमीच गजबज असते. लग्नसराईत तर पुण्यात गर्दीच गर्दी असते. एका पुण्यात मे महिन्यात जितकी लग्ने होतात, तितकी साऱ्या वर्षभरात सगळ्या महाराष्ट्रात होत नाहीत. पुण्यात शेकडो मंगल कार्यालये आहेत. एकेका कार्यालयात रोज दोन दोन, तीन तीन लग्ने होतात. लग्नासाठी जरूर त्या सर्व गोष्टी पुण्यात उपलब्ध असतात. तेथे शेकडो बँड आहेत. हवे तेवढे भटजी आहेत. वधूवर सूचक मंडळे आहेत. वरातीसाठी फुलांनी सुशोभित मोटारी आहेत. दागदागिन्यांनी मढलेले घोडे आहेत. वरातीत गाणारी मंडळीसुद्धा आहेत. मे महिन्यात रात्रीच्या वेळी पुण्याच्या रस्त्यांवर वरातींचा चकचकाट असतो. येथील माणसांना नटण्याची हौस आहे. स्त्रिया विविध प्रकारची उंची वस्त्रे नेसतात. डोक्यात गजरे माळतात. दागिन्यांनी मढतात. पुण्यातील वरात पाहण्यासारखी असते. महाराष्ट्रातील प्रत्येक माणसाला पुण्याचे आकर्षण असते. तो म्हणतो "पुणे तेथे काय उणे!"

**शब्दार्थ**

| | |
|---|---|
| नेहमी | सदैव, हमेशा |
| गजबज | भीड़, शोरगुल |
| लग्नसराई | शादी का मौसम |
| गर्दी | भीड़ |
| मंगल कार्यालय | विवाह-भवन |
| सर्व गोष्टी | सब चीजें |
| शेकडो | सैकडों |
| हवे तेवढे | जितने चाहिए |
| वधूवर सूचक मंडळ | वधूवर जानकारी केंद्र |
| वरात | बारात |
| सुशोभित | सुशोभित, सजा हुआ |
| दागदागिने | गहने, आभूषण |
| दागदागिन्यांनी मढणे | आभूषणों से लदे |
| गाणारी मंडळी | गायन-मंडली |
| रात्रीच्या वेळी | रात को |
| रस्त्यावर | रास्ते में |
| चकचकाट | चकाचौंध |
| नटण्याची हौस | सजने-धजने का शौक |
| उंची वस्त्रे | कीमती वस्त्र, महँगे कपड़े |
| नेसणे | पहनना |
| गजरा | गजरा |
| पाहण्यासारखी | देखने लायक |
| आकर्षण | आकर्षण |
| उणे | कमी |

**अभ्यास**

I अनुच्छेद के आधार पर नीचे दिए गए प्रश्नों के उत्तर दीजिए।

1) लग्नासाठी आवश्यक कोणकोणात्या गोष्टी पुण्यात उपलब्ध आहेत?
2) वरातीसाठी मोटार कशाने सजवतात?
3) वरातीत स्त्रिया कशा नटलेल्या असतात?
4) महाराष्ट्रातील प्रत्येक माणसाला पुण्याची ओढ असते या अर्थी कोणता शब्द वापरला आहे?
5) "पुण्यात काहीच कमी नाही" या अर्थी कोणता वाक्प्रचार वापरला आहे?

II पाठ और वाचन के आधार पर वाक्य पूरे कीजिए।

1) तिचे मामा ........ एका ........ आहेत.
2) त्यांची ........ मुलं, ........ आणि ........ त्यांच्याजवळच रहातात.
3) दोन ........ आहेत, त्या आपापल्या संसारात ........ आहेत.
4) वरातीसाठी ........ सुशोभित ........ आहेत.
5) रात्रीच्या वेळी ........ रस्त्यांवर वरातींचा ........ असतो.

III तिचे वय तीस आहे के लिए 'ती तिशीची आहे' का प्रयोग भी कर सकते हैं। इसी तरह नीचे दिए गए अंको का प्रयोग कर वाक्य बनाइए।

उदाहरण: तीस-तिशी

चाळीस, पन्नास, वीस, साठ

IV नीचे दिए गए मुहावरों का प्रयोग कर वाक्य बनाइए।

पोटासाठी दाही दिशा - रोजी-रोटी के लिए भटकना

हात पिवळे करणे- हाथ पीले करना

V उदाहरण के अनुसार नेस, माळ, घाल आणि चढव इन क्रियाओं का प्रयोग कर एक-एक वाक्य और बनाइए।

| | | |
|---|---|---|
| उदाहरण: | साडी नेस. | - ती साडी नेसते. |
| उदाहरण: | गजरा माळ. | - ती डोक्यात गजरा माळते. |
| उदाहरण: | सदरा घाल. | - तो अंगात सदरा घालतो/चढवतो. |
| उदाहरण: | जोडा चढव. | - तो पायात जोडा चढवतो/घालतो. |

VI कोष्ठक में दिए गए शब्दों का उपयुक्त प्रयोग कर वाक्य पूरे कीजिए।

(एकदा, प्रत्येक, एकाकी, एकटा, एकुलता एक, एक, एकेका)

1) काम करणं हे ........ माणसाचं कर्तव्य आहे.
2) माझ्याकडे ........ मुलाला पाठव.
3) ते ........ घर कुणाचं आहे?
4) मी इथे ........ बसतो.
5) या ........ आमच्या गावाला.
6) हा माझा ........ ........ भाऊ आहे.
7) मला ........ बाहुली दे.

VII हिंदी में अनुवाद कीजिए

लग्न म्हणजे आनंदाचा उत्सव असतो. लग्नातील धार्मिक विधी खूप अर्थपूर्ण असतात. परंपरा पाळणारे लोक या विधींत जास्त रस घेतात. लग्नात फक्त पारंपरिकता किंवा आधुनिकता असू नये. या दोघांचा संगम असावा. लग्नासाठी जास्त

खर्चाची गरज नसते. जास्त खर्च म्हणजे चांगलं लग्न अशी आज समजूत आहे. पण हे बरोबर नाही. लग्नात पैशाला महत्त्व न देता प्रेमाला महत्त्व द्यायला पाहिजे. कारण लग्न म्हणजे दोन व्यक्तींचं आणि दोन कुंटुंबांचं मीलन असतं. त्याहीपेक्षा ते मनांचं मीलन अधिक असतं.

VIII मराठी में अनुवाद कीजिए

अधिकतर आम मीठे होते हैं। किंतु यह कुछ खट्टा है। खाने से पहले आम को धो लेना चाहिए। देशी आमों की अनेक जातियाँ होती हैं। उन्हें चूस कर खाना चाहिए। काटकर नहीं खाना चाहिए। कुछ लोग कलमी आम को भी चूसकर खाते हैं। आम फलो में सबसे बढ़िया होता है। भारत के आमों की विदेश में भी बडी माँग है। आम गरमियों में पकते हैं। पकने से पहले ही पेटियो में बंद कर विदेश भेजा जाता है। कच्चे आम खट्टे होते हैं। खट्टे आमों से अचार बनाया जाता है। गर्मी का मौसम, आम और शादी का मौसम होता है। महाराष्ट्र में शादियों में आम रस और आम का अचार परोसा जाता है।

IX नीचे दिए गए शब्दों का प्रयोग कर मराठी में वाक्य बनाइए।
वसतिगृह, स्वतंत्रविचार, स्वातंत्र्य, तरुण, नातेवाईक, लग्नसराई, आवडनिवड

X 'मेरे दोस्त की शादी' विषयपर एक छोटा अनुच्छेद मराठी में लिखिए।

## टिप्पणियाँ

I इस पाठ में निम्नप्रकार के वाक्यों का प्रयोग किया गया हैं।
उदाहरण:

| | | |
|---|---|---|
| 1) | ती साताऱ्याला <u>असते</u>. | वह सातारा में (रहती) है। |
| 2) | तिच्या मामांकडे <u>असते</u>. | अपने मामा के यहाँ (रहती) है। |
| 3) | साताऱ्याला भयंकर उन्हाळा <u>असतो</u> ना? | सातारा में तो तो भयंकर गर्मी (पडती) है न? |
| 4) | साताऱ्याला कुठेशी <u>असते</u>? | सातारा में कहाँ (रहती) है? |

उपर्युक्त वाक्यों में 'अस' (है) क्रिया का प्रयोग किया गया है। 'आहे' (है) योजक क्रिया का प्रयोग आप सीख चुके हैं। ध्यान दें कि, हिंदी में अनुवाद करते समय 'आहे' तथा 'असते' क्रियाओं के लिए सिर्फ 'है' का प्रयोग ही होता है। लेकिन मराठी में 'आहे' और 'अस' क्रियारूप के प्रयोग में अंतर है। 'आहे' का प्रयोग 'इस समय' के अर्थ में होता है जब कि 'असतो' का प्रयोग 'सदा वैसा ही रहना' के अर्थ में होता है।

जिस प्रकार 'आहे' क्रिया के आहे, आहोत, आहेस, आहात, आहेत जैसे विभिन्न रूप होते हैं उसी प्रकार 'अस' क्रिया के भी भिन्न रूप होते हैं।

| | | *एकवचन* | *बहुवचन* |
|---|---|---|---|
| *उ.पु.* | *(पु.)* | मी असतो. | आम्ही असतो. |
| | | मैं हूँ। | हम हैं। |
| | *(स्त्री.)* | मी असते. | आपण असतो. |
| | | मैं हूँ। | हम हैं। |
| *म.पु.* | *(पु.)* | तू असतोस | तुम्ही असता. |
| | | तू हैं। | आप हैं। |
| | *(स्त्री.)* | तू असतेस. | आपण असता. |
| | | तू हैं। | आप हैं। |
| *अ.पु.* | *(पु.)* | तो असतो. | ते असतात. |
| | | वह है। | वे है। |
| | *(स्त्री.)* | ती असते. | त्या असतात. |
| | | वह है। | वे है। |
| | *(नपुं.)* | ते असते. | ती असतात. |

II नीचे दिए गए वाक्यों पर ध्यान दीजिए।

उदाहरण:

| | | |
|---|---|---|
| 1) | साताऱ्याला भयंकर उन्हाळा पडत असतो ना? | सातारा में तो भयंकर गर्मी पडती है ना? |
| 2) | तिच्या मामांकडे राहात असते. | अपने मामा के यहाँ रहती है। |
| 3) | सुमन तिथंच राहात असते. | सुमन वहीं रहती है। |
| 4) | सुमनही येत असते. | सुमन भी आती रहती है। |

उपर्युक्त वाक्यों में रेखांकित क्रियारूप क्रिया करने की आदत को दिखाता है। माने, ऐसा क्रियारूप आदत का द्योतक हैं। यह इस बात का सूचक है कि हम किसी कार्य को आदतन या स्वभाववश करते हैं। ऐसी क्रियाओं को अभ्यासिक क्रियाएँ कहते हैं। आप पढ चुके हैं कि 'आहे' योजक क्रिया के प्रयोग कर अपूर्ण वर्तमान कालिक क्रियाएँ बनती हैं जो आदतन वाली 'अस' क्रिया रूपों से भिन्न है।

| | | |
|---|---|---|
| उदाहरण: | मी जाते आहे. | मैं जा रहा हूँ। |
| | मी जात असतो. | मैं जाता रहता हूँ। |

अब 'अस' क्रिया के विविध रूपों पर ध्यान दीजिए।

| | | *एकवचन* | *बहुवचन* | |
|---|---|---|---|---|
| *उ.पु.* | *(पु.)* | मी जात असतो. | आम्ही } | जात असतो. |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | मैं जाया करता हूँ। | | |
| | *(स्त्री.)* | मी जात असते. | आपण | हम जाया करते हैं। |
| | | मैं जाया करती हूँ। | | |
| *म.पु.* | *(पु.)* | तू जात असतोस. | तुम्ही | जात असता. |
| | | तुम जाया करते हो। | | |
| | *(स्त्री.)* | तू जात असतेस. | आपण | आप जाया करते हैं/करती हैं। |
| | | तुम जाया करती हो। | | |
| *अ.पु.* | *(पु.)* | तो जात असतो. | ते | जात असतात. |
| | | वह जाया करता है। | | |
| | *(स्त्री.)* | ती जात असते. | त्या | वे जाया करते/करती हैं। |
| | | वह जाया करती है। | | |
| | *(नपुं.)* | ते जात असतात. | ती | जात असतात. |

III 'अस' क्रिया के निषेधवाचक रूप बनाने के लिए 'अस' के स्थान पर 'नस' का प्रयोग किया जाता है।

| | एकवचन | | बहुवचन |
|---|---|---|---|
| उ.पु. (पु.) | मी जात नसतो. | आम्ही | जात नसतो. |
| | मैं नहीं जाया करता हूँ। | | |
| (स्त्री.) | मी जात नसते. | आपण | हम नहीं जाया करते। |
| | मैं नहीं/जाया करती हूँ। | | |
| म.पु. (पु.) | तू जात नसतोस. | तुम्ही | जात नसता. |
| | तू नहीं जाया करता। | | |
| (स्त्री.) | तू जात नसतेस. | आपण | आप नहीं जाया करते/करती। |
| | तू नहीं जाया करतीं। | | |
| अ.पु. (पु.) | तो जात नसतो. | ते | जात नसतात. |
| | वह नहीं जाया करता। | | |
| (स्त्री.) | ती जात नसते. | त्या | वे नहीं जाया करते/करती हैं। |
| | वह नहीं जाया करती। | | |
| (नपुं.) | ते जात नसतात. | ती | जात नसतात. |

# धडा पाठ 10

## रमाच्या घरात

वैशाली : नमस्ते मावशी, इथे एकट्याच बसून कसला विचार करता आहात?

मावशी : अरे, कोण? वैशाली का? काही नाही गं! ये ना आत ये.

वैशाली : मावशी, रमा कुठं आहे?

मावशी : आत बसून वाचतेय बघ! जा ना आत जा.

वैशाली : मावशी, मी आता आत येत नाही. या वह्या जरा रमाला द्या नं.

मावशी : अगं, तूच आत जाऊन दे नं। ती ही वाचून वाचून कंटाळते.

वैशाली : नको, मावशी. तिच्या अभ्यासात व्यत्यय नको.

रमा : ए वैशू, मी वाचून वाचून थकून जाते. तू ये नं. जरा वेळ गप्पा मारू या.

मावशी : वैशू, एक मिनीट थांब. हा चहा घेऊन जा. अरे हो! पण तुला कॉफी आवडते. चहा आवडत नाही. थांब हं, मी तुझ्यासाठी कॉफी करते.

वैशाली : नको मावशी, ही आत्ताच घेऊन येतेय मी. मुद्दाम नका करू कॉफी. मला चहानं मळमळतं म्हणून मला चहा आवडत नाही. आणि खरं सांगू का? लोकांना त्रास देताना कसं तरी वाटतं. रमाचा चहा द्या. तो घेऊन जाते.

मावशी : अगं त्यात त्रास कसला? तुला दूध चालतं ना? आवडतं ना? मग तू दूधच घे.

## रमा के घर में

वैशाली : नमस्ते मौसी, यहाँ अकेले बैठे-बैठे क्या सोच रही हो?

मौसी : अरे कौन! वैशाली? कुछ नहीं। आओ, अंदर आओ।

वैशाली : मौसी, रमा कहाँ है?

मौसी : अंदर बैठकर पढ़ रही है। जाओ अंदर जाओ न।

वैशाली : मौसी अब मै अंदर नहीं आती। ये कॉपियाँ रमा को दे दीजिए।

मौसी : अरे, तुम ही अंदर जाकर दे दो न। वह भी पढ़ते-पढ़ते ऊब जाती है।

वैशाली : नहीं मौसी, उसकी पढ़ाई में बाधा नहीं (डालना) चाहिए।

रमा : अरे वैशू, मैं पढ़ते पढ़ते थक जाती हूँ। तुम आओ न। थोडी देर बातें करें।

मौसी : वैशू, एक मिनट रुको। ये चाय लेकर जाओ। अरे हाँ, पर तुम्हें कॉफी पसंद है। चाय पसंद नहीं है। ठहरो, मैं तुम्हारे लिए कॉफी बनाती हूँ।

वैशाली : नहीं मौसी मैं अभी-अभी पीकर आई हूँ। अकेले मेरे लिए कॉफी मत बनाइए। चाय से मेरा जी मिचलाता है। इसलिए मुझे चाय पसंद नहीं है और सच बताऊँ क्या? दूसरों को कष्ट देना मुझे अच्छा नहीं लगता। रमा के लिए चाय दीजिए। मैं ले जाती हूँ।

मौसी : अरे इसमें कष्ट कैसा? तुम दूध तो पीती हो न? दूध पसंद है न? तुम दूध ही लो।

| | |
|---|---|
| वैशाली : हो दूध चालतं. फक्त चहानं मळमळतं इतकंच! | वैशाली : हाँ दूध ठीक है। सिर्फ चाय से जी मिचलाता है। |
| रमा : ए आई, चहाबरोबर चिवडाही पाठव. वाचता वाचता खाऊ. | रमा : ओ माँ, चाय के साथ थोड़ा चिवड़ा भी भेज दो। पढ़ते-पढ़ते खाएँगे। |
| माधव : वाचता वाचता की गप्पा मारता मारता? | माधव : पढ़ते-पढ़ते या बातें करते करते? |
| रमा : या, घरात पाय टाकताच रेडिओ सुरु! | रमा : आओ, घर में पैर रखते ही रेडिओ शुरु! |
| माधव : आणि रेडिओ सुरु होताच तुझं भांडण सुरु! | माधव : और रेडिओ के शुरु होते ही तुम्हारा झगड़ा शुरु! |
| मावशी : आता पुरे हं। भांडणं ऐकून ऐकून कान किटतात अगदी! तू घरात शिरताच भूकंप होतो नुसता। चल, आधी रेडिओ बंद कर पाहू. तिला अभ्यास करू दे. | मौसी : बस भी करो। झगड़ा सुनते-सुनते मेरे कान पक गए हैं। तुम्हारे घर में घुसते ही भूचाल आ जाता है। चलो पहले रेडिओ बंद करो। उसे पढ़ने दो। |
| रमा : याची तर सगळी कामंच रेडिओ ऐकता ऐकता होतात. | रमा : इसके तो सारे काम ही रेडिओ सुनते-सुनते होते हैं। |
| माधव : तूही रेडिओ ऐकता ऐकता अभ्यास कर. पहा किती छान अभ्यास होतो तो। | माधव : तुम भी रेडिओ के चलते पढ़ा करो। देखो कितनी अच्छी पढ़ाई होती है। |
| रमा : माफ करा भाऊराया। | रमा : माफ करो भाई साहब। |
| माधव : जशी तुझी मर्जी। आई, मी जातो बाहेरच। करा पोटभर अभ्यास. | माधव : तुम्हारी जैसी मर्जी। माँ मैं तो बाहर चला। कर लो जी भर कर पढ़ाई। |
| मावशी : जाता जाता एवढं पत्र पोस्टात टाकतोस का? | मौसी : जाते-जाते यह पत्र पोस्ट में डालते जाओगे क्या? |
| माधव : जरूर। दे इकडे. | माधव : जरूर। दे दो। |

शब्दार्थ

| | |
|---|---|
| एकटी | अकेली |
| विचार करणे | सोचना |
| आत ये | अंदर आओ |
| कुठे आहे | कहाँ है? |
| आत बसून | अंदर बैठकर |
| आत येत नाही | अंदर आती नहीं |
| आत जाऊन | अंदर जाकर |
| व्यत्यय आणणे | बाधा निर्माण करना |

| | |
|---|---|
| थकणे | थक जाना |
| जरा वेळ | थोड़ी देर |
| गप्पा मारणे | गप्प मारना, बातें करना |
| थांब | रुको |
| आवडणे | पसंद आना |
| मळमळणे | जी मिचलाना |
| त्रास | तकलीफ |
| वाटणे | लगना |
| चिवडा | चिवड़ा |
| घरात पाय टाकताच | घर में आते ही |
| पाय | पैर |
| भांडण | झगड़ा |
| सगळी कामं | सब काम |
| पोटभर | भरपेट |
| पत्र | पत्र, चिट्ठी |

## अभ्यास

I नीचे दिए गए प्रश्नों के उत्तर दीजिए।

1) वैशालीला चहा घेतल्याने काय होते?
2) चहाबरोबर खायला काय आहे?
3) माधव कोणाचा भाऊ आहे?
4) माधव घरात येताच काय करतो?
5) आई माधवला काय काम सांगते?

II उदाहरण के अनुसार वाक्यों का परिवर्तन कीजिए।

*उदाहरण:* रमा वाचता वाचता चिवडा खाते.
रमा वाचताना चिवडा खाते.

1) तू गप्पा मारता मारता हसतोस.
2) तू शाळेत जाता जाता हे पत्र पोस्टात टाकतेस का?
3) तुम्ही खाता खाता पेपर वाचताय.
4) मी गाणे गाता गाता वाचतोय.
5) मी टी.व्ही. वर सिनेमा बघता बघता जेवतो.
6) आम्ही फुले गोळा करता करता गाणी म्हणतो.
7) उमेश बोलता बोलता हसतो.
8) प्रिया शाळेत जाता जाता उमाशी भांडते.
9) रामराव खेळता खेळता दमतात.

10) आपण बागेत काम करता करता रेडिओ ऐकतो.
11) मुले रेडिओ ऐकता ऐकता काम करतात.

III उदाहरण के अनुसार वाक्यों का परिवर्तन कीजिए।

*उदाहरण:* सुधा गप्पा मारताना झोपते.
सुधा गप्पा मारता मारता झोपते.

1) मी चहा घेताना शांताची बाहुली बघते.
2) मी बसताना प्रियाशी बोलतो.
3) तू सामान आणताना मैत्रिणीशी बोलतेस.
4) तू खाताना बोलतोस.
5) आम्ही पाने गोळा करताना झाडाखाली बसतो.
6) तुम्ही नाटक बघताना झोपता.
7) रमेश चालताना पेरु खातो.
8) उमा खेळताना थकते.
9) त्या दोघी पसारा आवरताना भांडतात.
10) ते दोघं नाचताना हसतात.
11) आपण घरी येताना देवळात जाऊ या.

IV उदाहरण के अनुसार कोष्ठक में दिए गए शब्दों के उपयुक्त रूप बनाकर वाक्य पूरे कीजिए।

*उदाहरण:* रेडिओ ....... .......कान किटतात. (ऐक)
रेडिओ ऐकून ऐकून कान किटतात.

1) दिवसभर ....... ....... माझे पाय दुखतात. (नाच)
2) सारखं काम ....... ....... मी थकते. (कर)
3) त्याची वाट ....... ....... मी कंटाळते. (बघ)
4) कॉफी ....... ....... मला मळमळतं. (पी)
5) तुला पैसे ....... ....... माझे पैसे संपले. (दे)

V उदाहरण के अनुसार वाक्य बनाइए।

*उदाहरण:* सुधा चहा पिताना गप्पा मारते.
सुधा चहा पिऊन गप्पा मारते.

1) मी अभ्यास करताना गाणी ऐकते.
2) तू काम करताना पेरु खातोस.
3) आम्ही बाहेर जाताना चिंचा खातो.
4) तो पत्र लिहिताना खाली बसतो.
5) ती वर्गात येताना हसते.
6) त्या दोघी बाहिणी जेवण करताना गप्पा मारतात.

VI उदाहरण के अनुसार वाक्य पूरे कीजिए।

*उदाहरण:* तिचे काम पूर्ण ......... (हो). ती ......... (झोप).

तिचे काम पूर्ण होताच ती झोपते.

1) तुला काही गोष्ट (सांग) ......... तू ......... (हस).
2) तू घरी पाऊल (टाक) ......... उमेश तुझ्याकडे ......... (धाव).
3) तुमचा अभ्यास (हो) ......... तुम्ही इकडे येऊन सिनेमा ......... (बघ).
4) मी अंथरूणावर (पड) ......... मला झोप ......... (लाग).
5) आम्ही बागेत पाऊल (टाक) ......... एक कुत्र्याचं पिलू ......... (पाहणे).
6) प्रियाचे लिहून (हो) ......... ती गाणे ......... (ऐक).
7) प्रकाश घरी (ये) ......... अभ्यासाला सुरवात ......... (करणे)
8) त्या दोघी घरात (शिर) ......... भांडणाला सुरवात ......... (होणे)
9) आपण थिएटरमधे पाऊल (टाक) ......... सिनेमा सुरु ......... (होणे)

VII उदाहरण के अनुसार कोष्ठक में दिए गए शब्दों के उपयुक्त रूप बनाकर वाक्य पूरे कीजिए।

उदाहरण: सुधाला चहानं (मळमळ). सुधाला चहानं मळमळतं.

1) तुला हिंदी ......... (समज-)
2) मला दुपारी घरी ......... (करम-)
3) मला इथे ......... नाही. (करम-)
4) मला फार ......... (उकड-)

VIII उदाहरण के अनुसार निषेध वाचक निषेधात्मक वाक्यों को सकारात्मक बनाइए।

उादरण: मला चहा आवडत नाही.

मला चहा आवडतो.

1) तुला दूध आवडत नाही.
2) तुला ही साडी चालत नाही.
3) मला ते बरोबर वाटत नाही.
4) तुम्हाला वाचताना खाणं लागत नाही.
5) उमेशला बटाटेवडा आवडत नाही.

IX उदाहरण के अनुसार कोष्ठक में दिए गए क्रिया शब्दों के उपयुक्त रूपों का प्रयोग कर वाक्य पूरे कीजिए।

*उदाहरण:* उमेश शाळेतून ......... वाचतो. (ये)

उमेश शाळेतून येऊन वाचतो.

1) तू आंबा ......... काम करतोस. (खा)
2) तू पुस्तक ......... पेरू खातेस. (वाच)
3) तुम्ही एकटेच ......... विचार करता. (बस)

4) आम्ही आत ......... चहा पितो. (ये)
5) मी अभ्यास ......... थकते. (कर)
6) मी वाचता वाचता ......... जाते. (झोप)
7) आम्ही बागेत ......... फुले आणतो. (जा)
8) रामू दुकानात ......... लक्ष देतो. (ये)
9) त्या दोघी बहिणी चहा ......... घरी येतात. (पी)
10) बाबा स्वयंपाकघरातून चहा ......... वैशालीला देतात. (आण)
11) आपण घरात ......... गप्पा मारूया. (बस)

X कोष्ठक में दिए गए शब्दों के उपयुक्त रूपों का प्रयोग कर वार्तालाप पूरा कीजिए।

प्रिया, तू माझ्याबरोबर ......... ? (येणे)
चल बागेत ......... गप्पा मारूया. (जाणे)
कॉफी .........? (करणे)
पण थांब. आपण
बागेत गप्पा ....... ....... (मारणे) गाणीही ऐकू.
चल ही कॅसेट बागेत ......... (घेणे) जाऊ या.
हा घे चिवडा. गाणी ......... (ऐकणे) खाऊया.

XI नीचे दिए गए शब्दों के उपयुक्त रूप बनाकर संवाद पूरा कीजिए।
(ये, पी, फिर, जा, आण, खेळ, डोल, पहा)

उषा: रमा, बाहेर ......... का?
रमा: थांब. मी चहा ......... ......... .
उषा: ......... . एक पिशवीही ......... .
रमा: कशासाठी?
उषा: बागेत ......... येऊ या. ......... मंडईतून भाजीही ......... .
रमा: मला रोज मंडईत ....... ....... कंटाळा येतो.
उषा: बरं बाई, फक्त बागेत ........
रमा: हं. बागेत ......... . ......... मुलं आणि ......... फुलं पाहू या.

XII 'ऐक' क्रिया के उपयुक्त रूपों का प्रयोग कर वाक्य पूरे कीजिए।

1) मी हे गाणं ......... येते.
2) मी हे गाणं ....... ....... काम करते.
3) मी हे गाणं ......... काम करते.
4) हे गाणं ....... ....... मी कंटाळते.
5) हे गाणं ......... मी खूश होते.

XIII उदाहरण के अनुसार नीचे दिए गए वाक्यों को जोड़िए।

*उदाहरण:* मी बसते. मी अभ्यास करते.
मी बसून अभ्यास करते.

1) मी उठते. मी चहा करते.
2) मी गाणं गाते. मी येते.
3) मी वह्या देतो. मी जातो.
4) तो पत्र टाकतो. तो परत येतो.
5) आजी गोष्ट सांगते. आजी देवाची पूजा करते.

पढिए और समझिए

सावळा गोंधळ

आमच्या घरांत चारच माणसं आहेत. हे म्हणजेच माझे पती. मी म्हणजे गृहिणी, गृहदेवता! आणि आमची दोन मुलं - दोन रत्नं। आम्ही दोन आणि आमची दोन असा सुखी संसार! पण घरात एकच गोंधळ असतो.

ती तिघंच आहेत पण तिघांच्या तीन तऱ्हा. ह्यांना सकाळी गरम चहा लागतो. त्यांना चहाच आवडतो. कॉफी आवडत नाही. रमाला-आमच्या लेकीला कॉफीच लागते. तिला चहा आवडत नाही. माधवला - आमच्या लेकाला थंडगार दूधच हवं. त्याला चहा किंवा कॉफी काहीच आवडत नाही. त्याला फक्त दूध आवडतं. मला मात्र काहीही चालतं.

कामाच्या बाबतीत तोच गोंधळ! हे उठून चहा घेतात. चहा घेताना पेपर वाचतात. तो ही मनातल्या मनात नाही. चांगला जोरजोरात वाचतात. त्याच वेळी माधव रेडिओ लावतो.

रेडिओ ठणाणत असतो. आंघोळ करताना, दाढी करताना, कपडे घालताना, अगदी दूध पितानासुद्धा माधव जोरजोरात गात असतो. त्याला वाटतं आपण मुकेशच आहोत. रमाची निराळीच तऱ्हा. तिचं कॉलेज सकाळचं असतं. ती घाईगर्दीत असते. घाईघाईनं आवरताना हे सांड; ते लवंड असं चालू असतं. तीआपलं आवरताना खरं तर पसाराच जास्त करते. तो मी नंतर आवरते.

घाईघाईनं आवरुन सगळे नऊ वाजता घर सोडतात. मी सुखाचा निश्वास सोडून पुनः कामाला लागते. काम असतंच, पण शांतता तरी असते!

शब्दार्थ

| | |
|---|---|
| रत्न | रत्न |
| तीन तऱ्हा | तीन प्रकार |
| आवड | पसंद |
| लेक | बेटा, बेटी |
| काहीही | कुछ भी |
| कामाच्या बाबत | काम के बारे में |
| मनातल्या मनात | मन ही मन में |

| | |
|---|---|
| निराळी तऱ्हा | अलग तरीका |
| आवरणे | समेटना |
| पसारा करणे | पसारा करना |
| घर सोडणे | घर से निकलना |
| सुखाचा निश्वास | चैन की साँस |
| तऱ्हा | प्रकार, रीति |

## अभ्यास

I नीचे दिए गए प्रश्नों के उत्तर दीजिए।

1) आमचा संसार कसा आहे?
2) रमाला काय आवडते, काय आवडत नाही?
3) रमाचे पती चहा घेता घेता काय करतात?
4) रेडिओ मोठ्या आवाजात ओरडत असतो या अर्थी कोणता शब्द वापरला आहे?
5) माधव केव्हा केव्हा जोरजोरात गात असतो?
6) रमा आवरताना काय करते?

II तू घरात शिरताच भूकंप होतो नुसता।
भूकंप के सामान्य अर्थ का प्रयोग होगा - जपानमध्ये नेहमी भूकंप होतात.
इसी तरह 'भूकंप' शब्द का दोनों अर्थो में प्रयोग कर वाक्य बनाइए।

III एक ही शब्द के दोहराने से जो शब्द-युग्म बनते हैं उन से अर्थ की गहनता या तीव्रता प्रकट होती है।
*उदाहरण:* गरमागरम, घाईघाईने, जोरजोरात, हळूहळू, इत्यादि
इसी तरह के कुछ और शब्द लिखिए।

IV नीचे दिए गए शब्द-युग्म पढ़िए। इन में एक ही अर्थ के दो शब्द साथ-साथ आए हैं। इनके साथ में आने से अर्थ की गहनता या तीव्रता प्रकट होती है।
*उदाहरण:* थंडगार
नीचे कुछ शब्द दिए हैं, उनके साथ कोष्ठक में दिए गए शब्दों में से उपयुक्त शब्द चुनकर जोड़ियाँ बनाइए।

| | |
|---|---|
| घाई | साधा |
| भर | काळा |
| दंगा | लाल |
| सांड | |

(मस्ती, गर्दी, लवंड, भडक, भोळा, गच्च, सावळा)

V कुछ विशेषण शब्द 'ता' प्रत्यय जोड़ने से संज्ञा शब्द बन जाते हैं। नीचे दिए गए शब्दों में 'ता' जोडकर उन्हें संज्ञा बनाइए और वाक्य में प्रयोग कीजिए।

*उदाहरण:* शांत - शांतता

उदार -

वीर -

भावुक -

धार्मिक -

VI हिंदी में अनुवाद कीजिए

महाराष्ट्राचे वर्णन करतांना सुप्रसिद्ध कवी गोविंदाग्रज त्याला "कणखर देशा" "दगडांच्या देशा" असे म्हणतात. महाराष्ट्रात सह्याद्रीचे विशाल कडे आहेत. तसेच सातपुडा पर्वत पण आहे. महाराष्ट्रातील लोकांचेया शौर्य आणि साहसी वृत्ती याचे हे पर्वत प्रतीक आहेत. मात्र, याबरोबरच मराठी मन कोमलही आहे. सुप्रसिद्ध संतकवी ज्ञानेश्वर, तुकाराम, नामदेव हे महाराष्ट्राचेच. वारकरी पंथाचा प्रचार करून आज ते अमर आहेत. दीनदुबळ्यांच्या पायाखाली आपले ह्रदय अंथरावे असं सांगून ते आजही सामाजिक एकतेचा संदेश देतात.

VII मराठी में अनुवाद कीजिए

बंडू, मुझे तुम्हारा शाम के वक्त पढ़ना अच्छा नहीं लगता। तुम जरा बाहर हो आओ। रात को खाकर तुम पढ़ सकते हो। तुम खाते ही सो जाते हो। तुम रात को क्यों नही पढ़ते? बच्चों को सायंकाल जरूर खेलना चाहिए। प्रातःकाल पढ़ना चाहिए। पढ़ते-पढ़ते तुम थक जाते हो। स्कूल से लौटते ही पढ़ने बैठ जाना ठीक नहीं। यह समय टहलने या खेलने का होता है। सायंकाल खेलने की जगह बच्चों को पढ़ते देख मुझे गुस्सा आता है। मुझे यह अच्छा नहीं लगता।

VIII 'मेरी दिनचर्या' इसपर एक छोटा अनुच्छेद मराठी में लिखिए।

## टिप्पणियाँ

I नीचे दिए हुए वाक्यों में क्रिया के रेखांकित प्रयोगों पर ध्यान दीजिए।

1) तो <u>बसून</u> म्हणाला. वह <u>बैठकर</u> बोला।

2) तो <u>खाऊन पिऊन</u> झोपला. वह <u>खाकर-पीकर</u> सो गया।

जब कर्ता के लिए दो या अधिक क्रियाओं का प्रयोग होता है, यानि की एक क्रिया खतम कर दूसरी क्रिया का आरंभ सूचित होता है तब पहली क्रिया में '-ऊन' (कर या करके) प्रत्यय लगता है।

तिला प्रथम थोडा त्रास झाला होता. म्हणून मी आधीच मराठी शिकते आहे.

राकेश : तासाची वेळ झाली. गप्पा मारत बसू नका.

रामकुमार : जाता जाता बोलू या.

अनघा : मीही येते तुमच्याबरोबर. तुम्ही सगळीजणंच मराठी शिकताहात हे काय कमी कारण झालं मला मराठी शिकायला?

करते मत बैठो।

रामकुमार : जाते-जाते बात करेंगे।

अनघा : मैं भी तुम्हारे साथ चलती हूँ। तुम सभी मराठी सीख रहे हो, यह क्या कम कारण है मेरे मराठी सीखने का?

शब्दार्थ

| | |
|---|---|
| मराठी शिकायचंय | मराठी सीखनी है |
| आजकाल | आजकल |
| असतेस कुठे? | कहाँ रहती हो? |
| वेड | पागलपन |
| नोकरी | नौकरी |
| आणखी | और |
| बरोबर | साथ-साथ |
| काय चाललंय? | क्या हो रहा है? |
| नवल वाटते | आश्चर्य हो रहा है |
| प्रेमात | प्यार में, प्रेम में |
| अत्यावश्यक | बहुत ज़रूरी |
| भ्रतार, नवरा | पति, भरतार |
| पुरस्कार विजेते | पुरस्कार विजेता |
| भाषांतर | अनुवाद |
| मूळातून | मूल रूप में |
| बालपण | बचपन |
| गोड आठवणी | मधुर स्मृतियाँ |
| जिवंत | जीता जागता, जीवंत |
| शिकणे | सीखना |
| स्थायिक झाली | बस गई |
| त्रास | असुविधा, कष्ट |
| तास | घंटा |
| जाता जाता | चलते चलते |

## अभ्यास

I नीचे दिए गए प्रश्नों के उत्तर दीजिए।

1) प्रिया मराठी कुठे शिकते?
2) राकेशच्या मराठी शिकण्याचे कारण काय आहे?
3) वि.स.खांडेकरांना कोणता पुरस्कार मिळला?
4) महेशचंद्राल काय आवडतं?
5) बीताची मावशी कोण आहे?

II वार्तालाप के आधार पर वाक्य पूरे कीजिए।

1) आपल्या सरकारनं ....... भाषा शिकवण्यासाठी ........ उघडलं भाहे.
2) महाराष्ट्रात नोकरी करायची तर ........ नको का .........?
3) वि.स.खांडेकर यांच्या ....... चे भाषांतर वाचलं आणि ठरवलं की ....... शिकायचंच.
4) महाराष्ट्रात प्रवास ......... म्हणून मी ........ शिकतो.
5) मी मराठी साहित्याच्या ........ पडलो आहे.
6) भाषेशिवाय .......... कशी समजेल?

III उदाहरण के अनुसार वाक्यों में परिवर्तन कीजिए।

1. *उदाहरण:* मी पुस्तक <u>वाचतो आहे</u>. मी पुस्तक <u>वाचत होतो</u>.

1) मी डोंगर पाहाते आहे. 2) आम्ही भाजी आणतो आहे.
3) तू जेवते आहेस.

2. *उदाहरण:* तू धडा <u>वाचतो आहेस</u>. तू धडा <u>वाचला आहेस</u>.

1) तुम्ही अंगणात काम करत आहात.
2) प्रकाश फुले तोडत आहे.

3. *उदाहरण:* रामराव सामान खरेदी <u>करत आहेत</u>. रामरावांनी सामान खरेदी <u>केलं होतं</u>.

1) आपण पाने गोळा करत आहोत. 2) तू चित्र काढतो आहेस.
3) तो फळं आणतो आहे.

IV उदाहरण के अनुसार नीचे दिए गए वाक्यों के निषेधवाचक रूप बनाइए।

1. *उदाहरण:* लोक डोंगर चढत <u>होते</u>. लोक डोंगर चढत <u>नव्हते</u>.

1) तू अभ्यास करत होतीस. 2) तू बागेत बसत होतास.
3) मी बाजारात जात होते.

2. *उदाहरण:* मी सुमनबरोबर <u>खेळत होतो</u>. मी सुमन बरोबर <u>खेळले नाही</u>.
   1) तुम्ही आंबे खात होता. 2) आम्ही विद्यार्थ्यांना शिकवत होतो.
   3) रामू सामान देत होता.

3. *उदाहरण:* प्रिया पुस्तक <u>वाचत होती</u>. प्रियानं पुस्तक <u>वाचलं नाही</u>.
   1) तो घर घेत होता. 2) तो कविता लिहित होता.
   3) ती सिनेमा पाहत होती.

V बायीं ओर दिए गए शब्दों के साथ दाहिनी ओर दिए गए शब्दों का सही मिलान कर वाक्यांश बनाईए।

| | |
|---|---|
| कांडलेला | गोष्टी |
| बघितलेले | शिक्षक |
| रागावलेले | कुत्रं |
| बसलेलं | डाळ |
| वाटलेली | मुली |
| सजलेल्या | किल्ले |
| चुकलेली | भात |
| विणलेले | वाट |
| लिहिलेल्या | पत्र |
| पडलेलं | रुमाल |

VI उदाहरण के अनुसार वाक्यों का परिवर्तन कीजिए।

1. *उदाहरण:* मला घर <u>आवडलं</u>. मला घर <u>आवडलं आहे</u>.
   1) प्रियाने साडी घेतली. 2) तुम्हाला पुस्तकं मिळाली.
   3) मी त्या गावाला गेलो.

2. *उदाहरण:* उमेशला गोष्ट <u>समजली</u>. उमेशला गोष्ट <u>समजली न</u>?
   1) सुमनने कविता वाचली. 2) मी भाषण ऐकले.
   3) सर्वांनी अभ्यास केला.

1. *उदाहरण:* शांताबाईंना बातमी <u>कळली</u>. शांताबाईंना बातमी <u>कळली नव्हती</u>.
   1) पिल्लाला झोप लागली. 2) आपल्याला खाऊ दिला.
   3) मुलांनी काम केले.

VII उदाहरण के अनुसार कोष्ठक में दिए गए शब्दों के उपयुक्त रूपों का प्रयोग कर वाक्य बनाइए।

1. *उदाहरण:* मी धुळ्याला ....... . (जाणे)

मी धुळ्याला गेले.

1) मी अलाहाबादहून ....... . (येणे) 2) तू मराठी ....... . (शिकणे)

2. *उदाहरण:* तू अंगण ....... ....... . (झाडणे)

तू अंगण झाडत होतीस.

1) आम्ही बागेत ...... ...... . (बसणे)

2) तुम्ही आंबे ........ ...... . (खाणे)

3. *उदाहरण:* रमेशने फुले ....... . (तोडणे)

रमेशने फुले तोडली.

1) मला सुमन बाजारात ......... . (भेटणे)

2) रामरावांनी सिनेमा ........ . (पाहणे)

4. *उदाहरण:* पिल्लं दूध ....... ....... . (पिणे)

पिल्लं दूध प्यायली होती.

1) आपण डोंगरावर ....... ....... . (चढ)

2) सगळे मराठी ....... ....... . (शिक)

3) मी साडी ....... ....... . (आण)

VIII उदाहरण के अनुसार वाक्यों का परिवर्तन कीजिए।

1. *उदाहरण:* मी मंडईत जाईन. मी मंडईत जाणार आहे.

1) आम्ही मंडईत जाऊ. ......................... .

2) मी वर्गात येईन. ......................... .

2. *उदाहरण:* आम्ही मंडईत जाऊ. आम्ही मंडईत जाणार नाही.

1) तू घरी जाशील. 2) तुम्ही वर्गात जाल.

3. *उदाहरण:* तो खेळ खेळल्यावर घरी गेला. तो खेळ खेळल्यानंतर घरी गेला.

1) तो अभ्यास केल्यावर शाळेत गेला.

2) मी अभ्यास केल्यावर सिनेमा पाहिला.

4. *उदाहरण:* ती अभ्यास केल्यामुळे पास झाली. तिनं अभ्यास केला.

ती पास झाली.

1) त्या झाडावर चढल्यामुळे पडल्या.

2) पिल्लू झाडावर चढल्यामुळे पडलं.

5. *उदाहरण:* पिल्लू दूध पिईपर्यंत थांबा.पिल्लू दूध पिईपर्यंत थांबू नका.

1) तुम्ही डॉक्टर येईपर्यंत थांबा. 2) आपण जेवण होईपर्यंत थांबा.

IX कोष्ठक में दिए गए शब्दों के उपयुक्त रूपों का प्रयोग कर अनुच्छेद पूरा कीजिए।

काल मी चार वाजता घरी ........ (जाणे). सर्व काम आटोपून सहा वाजता अभ्यासाला ........ (बसणे). रात्री दहा वाजेपर्यंत मी अभ्यास ......... (करणे). पूर्ण वाचून मी ......... (झोपणे). कारण मला आज सकाळी पाच वाजता ......... होते. (उठणे)

पढ़िए और समझिए

भाषा शिकणं म्हणजे काय?

नवीन भाषा शिकणं हा एक सुंदर अनुभव आहे. भाषा शिकणं म्हणजेच ती भाषा बोलणाऱ्यांची संस्कृती शिकणं! प्रत्येक समाजाचे आचार, विचार, रूढी, समजुती, इतिहास, भूगोल यांचं प्रतिबिंब भाषेत असतं. उदाहरणार्थ एस्किमो लोकांच्या भाषेत बर्फाला जवळजवळ वीस निराळे शब्द आहेत. बर्फच त्यांच्या आयुष्याचा आधार आहे. मराठीचीही अशीच वैशिष्ट्ये आहेत. मराठीशी हजारो वर्षांपासून संबंध आलेल्या भाषांचे शब्द तिच्यात सापडतात. कन्नड, अरबी-फारसी, इंग्रजी, आणि हिंदी यांचा तिच्या शब्दसंग्रहावर आणि वाक्यरचनेवर परिणाम झालेला आहे. त्यांच्याकडून काहीना काही घेऊन मराठीनं ते आत्मसात केलेलं आहे. भाषा ही नदीच्या प्रवाहासारखी असते. येणाऱ्या स्त्रोतांना सामावून घेत ती समृद्ध होते.

भाषा शिकणं म्हणजे फक्त व्याकरण शिकणंच नव्हे किंवा शब्दसंग्रह पाठ करणंही नव्हे. समाजाच्या वर्तणुकीचे नियम समजले तरच भाषेचे कंगोरे समजतील.

कुणाशी, कधी, कुठे आणि कसं बोलायाचं हे समजणं म्हणजेच भाषा शिकणं.

शब्दार्थ

| | |
|---|---|
| अनुभव | अनुभव |
| रूढी | रूढ़ी |
| समजुती | धारणाएँ |
| प्रतिबिंब | परछाँई |
| बर्फ | बर्फ़ |
| वैशिष्ट्ये | विशिष्टताएँ |
| वर्षांपासून | वर्षों से |
| परिणाम | असर |
| प्रवाहासारखी | प्रवाह जैसी |
| येणाऱ्या | आनेवाले |
| फक्त | सिर्फ |
| पाठ करणं | याद करना |
| वर्तणूक | बर्ताव |

| | |
|---|---|
| कंगोरे | बारीकियाँ, खुबियाँ |
| समजतील | समझेंगे |
| कुणाशी | किससे |
| कसं बोलायचं | क्या बोलना |

### अभ्यास

I नीचे दिए गए प्रश्नों के उत्तर दीजिए।

1) नवीन भाषा शिकणं म्हणजे कोणत्या गोष्टी शिकणं?
2) एस्किमो लोकांच्या भाषेत बर्फाला किती शब्द आहेत? त्यांच्या आयुष्याचा आधार काय असतो?
3) कोणकोणत्या भाषांचा मराठी शब्दसंग्रहावर आणि वाक्यरचनेवर परिणाम झाला आहे?
4) भाषेची तुलना कशाबरोबर केली आहे?

II अनुच्छेद के आधार पर सही कथन बताइए।

1) एस्किमो लोकांच्या भाषेत बर्फाला फक्त एकच शब्द आहे.
2) नवीन भाषा शिकणं हा एक सुंदर अनुभव आहे.
3) भाषा शिकणं म्हणजे फक्त व्याकरण शिकणं.
4) भाषा शिकणं म्हणजेच ती भाषा बोलणाऱ्यांची संस्कृती शिकणे.

III कोष्ठक में दिए गए शब्दों के समानार्थी शब्द अनुच्छेद में रेखांकित किए गए हैं। रेखांकित शब्दों के स्थान पर कोष्ठक में दिए गए शब्दों का प्रयोग कीजिए।
(लहानपणी, खूप, जरूरी, पुष्कळ, नवल, अलीकडे)

<u>आजकल</u> <u>अनेक</u> भाषा शिकणं <u>आवश्यक</u> झालं आहे. एखाद्याला <u>खूप</u> भाषा येतात याचं <u>आश्चर्य</u> वाटत नाही. <u>बालपणीच</u> मुलांच्या कानावर दोन किवा तीन भाषा पडतात.

IV विलोम शब्दों को जोडिए।

| | |
|---|---|
| सकाळ | अनावश्यक |
| जिवंत | जास्त |
| आधी | नंतर |
| कमी | मृत |
| आवश्यक | संध्याकाळ |

V 'तास' शब्द का प्रयोग कर नीचे दिए गए वाक्यों के अनुसार और तीन वाक्य बनाइए जिन में 'तास' का अलग अलग अर्थ हो।

1) मराठीच्या तासाची वेळ झाली.
2) साठ मिनिटांचा एक तास असतो.
3) त्याने लाकूड तासले. गुळगुळीत केले.

VI नीचे दिए गए वाक्यांशों का प्रयोग कर वाक्य पूरे कीजिए।
"मराठीने केला कानडी भ्रतार " " उंबराचं फूल"

1) "मला मंजू खूप दिवसात दिसली नाही. "मलाही!
ती अलीकडे ........... झाली आहे.
2) तिचं म्हणणं मला कळेना, माझं म्हणणं तिला!
म्हणतात ना ...........!

VII उदाहरण के अनुसार वाक्यों का परिवर्तन कीजिए।

1. *उदाहरण:* "मी अनघाला बोलावणार इतक्यात अनघाच आली."
मी अनघाला बोलावणार तोच अनघा आली.

1) मी रमेशला फोन करणार इतक्यात तो घरीच आला.
2) आई सुधाला डबा पाठवणार इतक्यात तीच जेवायला घरी आली.
3) नरेन्द्र सुधाला आपल्या गाडीत बसायला सांगणार, इतक्यात ती सुरेन्द्रच्या गाडीत गेलीसुद्धा.
4) आम्ही जेवायला बसणार इतक्यात पाहुणे आले.

2. *उदाहरण:* मी अनघाला बोलावणार तोच अनघा आली.
मी अनघाला बोलावणार त्याचवेळी अनघा आली.

1) मी बाहेर जाणार तोच मारपीट झाली.
2) तो नाटकाला जाणार तोच सुमनच्या मित्राचा फोन आला.
3) ट्रेन सुटणार तोच मोहन पळत पळत आला.

VIII नीचे दिए गए शब्दों का प्रयोग कर मराठी वाक्य बनाइए।
संध्याकाळी, केंद्र, कॉम्प्युटर, महानगर, नोकरी, नवल, प्रेम, अत्यावश्यक, चहाटळपणा, साहित्य, पुरस्कार, भाषांतर, प्रबंध, संस्कृती, इतिहास.

IX हिंदी में अनुवाद कीजिए।
मराठी भाषेचा आणि कन्नड भाषेचा तसा जवळचा संबंध आहे. महाराष्ट्र आणि कर्नाटक एकमेकांशेजारी आहेत. त्यांच्यांत बरीच सांस्कृतिक देवाणघेवाणही झालेली आहे. उत्तर कर्नाटकाने भारताला व महाराष्ट्राला अनेक गायक दिलेत. गंगुबाई हनगल, पं.भीमसेन जोशी हे त्यापैकीच. नाट्यवेड्या मराठी मनाला प्रिय असलेल्या

नाट्यसंगीताचा उगम कर्नाटक संगीतातूनच झाला आहे. महाराष्ट्राचे दैवत असलेला विठोबाही कर्नाटकातूनच आला. कविवर्य ज्ञानेश्वरांनी म्हटले आहेच "कानडाऊ विठ्ठलु कर्नाटकु, तेणे मज लावियले वेडु" "माझा विठ्ठल कानडी असून तो करणी करणारा आहे. त्याने मला वेड लावले आहे." "मराठीने केला कानडी भ्रतार, एकाचे उत्तर एका न ये कानी" असंही कवीने म्हणून संसारातला एक जोडीदार कन्नड आणि दुसरा मराठी असेल आणि एकानं बोललेलं दुसऱ्याला समजत नसेल तर कसा गंमतीदार घोटाळा होतो याचं मजेदार वर्णन केलं आहे. मराठी स्वयंपाकघर आणि कन्नड स्वयंपाकघर यांत खूप समान शब्द आहेत. स्वयंपाकाच्या पद्धतीत व वापराच्या गोष्टीत पण खूप साम्य आहे. मराठीतल्या 'आल्या' ला कानडीत 'शुंठी' म्हणतात. मराठीतही 'सुंठ' शब्द आहेच. पण तो वाळलेल्या आल्यासाठी. मराठीतली कोथिंबीर इथे 'कोथंब्री' आहे तर पडवळ पडवळच आहे. दोन्ही भाषांमध्ये खूप संस्कृत शब्द आहेत.

एवढ सगळे असून सुद्धा कन्नड भाषा शिकताना मला जड जाते आहे. दिल्लीहून म्हैसूरला आल्यावर आम्हाला म्हैसूर खूप आवडले. मात्र इथे राज्यसरकारच्या विविध कार्यालयातले बोर्डस्, रस्त्यांची व वसत्यांची नावं दाखविणारे सगळे फलक फक्त कन्नडलिपीत. ते वाचता येत नाही म्हणून फार पंचाईत होते. वाण्याशी बोलताना, भाजीवाल्याशी बोलताना, घरगुती नोकरांकडून कामं करून घेताना सगळीकडे अडचणच अडचण सगळंच कन्नड!.

अखेर, कन्नडभाषा खूप जोमाने शिकायचा मी निर्णय घेतला आहे. भारतीय भाषा संस्थानातून कन्नडभाषाशिक्षणक्रमाच्या कॅसेट्स् विकत घेतल्या आहेत. शिवाय त्या भाषेच्या पाठ्यक्रमाची पुस्तकेपण विकत घेतली आहेत. म्हैसूरचे आणि एकंदरीतच कर्नाटकातले लोक खूप मनमिळाऊ आणि नेहमी मदत करायला तयार असणारे आहेत. त्यांच्याशी त्यांच्याच भाषेत बोलून विचार आणि भावनांचे आदानप्रदान करता आले तर किती छान होईल!

XII मराठी में अनुवाद कीजिए।

विवेकहीन बंदर

एक राजा था। उसकी मित्रता एक बंदर से हो गई। वह बंदर सदा राजा के साथ रहता था। राजा को वह बंदर बहुत प्रिय था।

एक दिन राजा के मंत्री ने सोचा यदि उस बंदर को राजा के अंगरक्षक का प्रशिक्षण दे दिया जाए तो ठीक रहेगा। मंत्री ने यह बात राजा से कही। राजा ने सहर्ष अपनी सहमति दे दी। मंत्री ने सेना नायक से कहा कि बंदर को तत्काल अंगरक्षक का प्रशिक्षण दिया जाए। नकल करने में तो बंदर बहुत कुशल होता है। उसने शीघ्र ही प्रशिक्षण पूरा कर लिया।

अब तो बंदर पूरे उत्साह से तलवार कंधे पर उठाए राजा के साथ रहने लगा। मंत्री ने बंदर को समझाया कि, वह सावधानी से राजा की रक्षा करे। जब राजा सो जाता तब बंदर नंगी तलवार कंधे पर रखकर राजा के पलंग के चारों ओर चक्कर लगाता रहता। मंत्री ने बंदर को समझाया कि, कोई भी व्यक्ति अंदर न आ जाए। राजा

के कक्ष में केवल वही व्यक्ति आ सकता था जिसे अंदर आने की अनुमति दी गई थी। बंदर की उस तत्परता से राजा और मंत्री दोनों बहुत खुश थे।

एक दिन जब राजा सो रहा था, तब बंदर नंगी तलवार अपने कंधे पर रखे, पलंग के चारों ओर घूम-घूमकर रखवाली करने लगा। बंदर बहुत सतर्क होकर रखवाली कर रहा था। तभी उसने देखा, एक बड़ी सी मक्खी राजा के सिर पर आ बैठी है। बंदर ने उसे तत्काल उड़ा दिया। मक्खी नाक से उड़कर राजा की गर्दन पर आ बैठी। बार-बार उड़ाने पर भी मक्खी ने राजा के शरीर पर बैठना नहीं छोड़ा। एक जगह से उड़कर दूसरी जगह बैठ जाती। मक्खी की उस हिमाकत से बंदर की खीज बढ़ गई। उसे मक्खी पर गुस्सा आ रहा था। वह ज्यादा खटर-पटर कर के राजा की नींद में भी बाधा नहीं पहुँचाना चाहता था। इसलिए बंदरने एकबार फिर तलवार की नाक से मक्खी को उड़ाया। लेकिन मक्खी भी बड़ी ज़िद्दी निकली। वह फिर आकर राजा की गर्दन पर आ बैठी। अब तो बंदर का गुस्सा चरम सीमा पर पहुँच गया। एक छोटी सी मक्खी तक उसका हुकुम नहीं मान रही है। इसकी यह मजाल!

बंदर गुस्से में पागल हो उठा। उसने आव देखा न ताव। झट से अपनी तलवार सम्हाल ली। मक्खी पर निशाना साध कर एक भरपूर वार कर दिया। तलवार के वार से मक्खी तो उड़ गई किन्तु राजा की गर्दन धड़ से अलग हो गई। राजा का चिल्लाना सुनकर बाहर खड़े संतरी भीतर दौड़े आए। तभी वहाँ मंत्री भी आ पहुँचा। बंदर की मूर्खता और राजा की हत्या देखकर मंत्री ने यों सोचा, "केवल प्रशिक्षण प्राप्त कर लेने से कोई योग्य नहीं हो जाता। उसमें स्वयं का विवेक भी होना आवश्यक है।"

## टिप्पणियाँ

1. वि.स.खांडेकर - जन्म 11-01-1898, सांगली; मृत्यु 2-09-1976
मराठी के सुप्रसिद्ध उपन्यासकार थे। 'हृदयाची हाक' इनका पहला उपन्यास है। बोध और उद्बोधन ये इनकी उपन्यास की विशेषताएँ हैं। 'रूपक कथा' (अन्योक्ति) यह आधुनिक काल में इन्हों ने लिखी। यह इन की पसंदीदा साहित्य-विधा थी। 'कांचनमृग', 'दोन ध्रुव', 'उल्का', 'दोन मने', 'पहिले प्रेम', 'क्रौंचवध', 'ययाती', अमृतवेल' आदि इनके प्रसिद्ध उपन्यास हैं। 'रंकाचे राज्य' इनका एकमेव नाटक है। इनके 'वायूलहरी', 'चांदण्यात', 'सायंकाळ', 'अविनाश', 'तिसरा प्रहर' आदि निबंध संग्रह भी प्रसिद्ध हैं। 'सांजवात', 'हस्ताचा पाऊस', 'कलिका', 'वनदेवता', 'फुले आणि दगड', 'स्त्री आणि पुरुष' आदि इनके कथा संग्रह प्रसिद्ध हैं। 'एका पानाची कहाणी' यह इनकी आत्मकथा है। वे साहित्य में 'जीवनासाठी कला' कला जीवन के लिए के समर्थक थे। इनके 'ययाति' उपन्यास को साहित्य क्षेत्रका सर्वोच्च सम्मान 'ज्ञानपीठ पुरस्कार' 1974 में दिया गया। वे मराठी के 'ज्ञानपीठ पुरस्कार' प्राप्त करनेवाले पहले लेखक हैं। वे 1958 में सातारा में हुए अखिल भारतीय मराठी नाट्यसंमेलन के और 1941 में सोलापूर में हुए अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलन के अध्यक्ष रह चुके

है। खांडेकरजी मूलतः उपन्यासकार, कथाकार और निबंधकार के रूप में जाने जाते है।

वे पेशे से शिक्षक थे। इन्होनें लघु कथा, रूपक कथा, उपन्यास, नाटक, कविता, पटकथा, समीक्षा, निबंध आदि साहित्य-विधाओं की रचना की। 1923 में 'घर कोणाचं' इनकी पहली कथा प्रसिद्ध हुई। इन्हें आदर्श के प्रति आकर्षण था। इनके लेखन में आदर्श, काव्यात्मकता, चिंतनशीलता, उदारता, नवीनता का आकर्षण, निसर्गवर्णन, निर्मलवृत्ति, सामाजिकता आदि का दर्शन होता है। इन्हों ने अनेक नवलेखकों को प्रोत्साहित किया तथा मार्गदर्शन किया। इन्होंने 1 नाटक, 15 उपन्यास, 30 कथासंग्रह, 6 रूपक कथासंग्रह, 11 लघुनिबंधसंग्रह, 12 टीकासंग्रह, 21 संपादन, 18 चित्रपटकथाएँ और 4 प्रकीर्ण पुस्तकें लिखी हैं। इनके लेखन का अनुवाद गुजराती, तमिळ और हिंदी में हुआ है। 'छाया' 'ज्वाला', 'देवता', 'सुखाचा शोध', 'सरकारी पाहुणे' जैसे मराठी और 'बडी माँ', 'सुभद्रा', 'दानापानी' जैसे हिंदी फिल्मों की पटकथाएँ खांडेकरजी की थी। इनके लेखन में कला और जीवन का संगम पाया जाता है। इन्होंने 1924 में 'वैनतेय' (साप्तहिक) का संपादन किया था। इन्हें भारत सरकारने 1968 में 'पद्मभुषण' पुरस्कार से सम्मानित किया था।

2. महाराष्ट्राची लोककला - लोककला में लोकसाहित्य, लोकगीत, लोकसंगीत आदि का समावेश होता हैं। महाराष्ट्र में देवी के, वासुदेव के, पोतराज के वाघ्या मुरली के, विविध त्योहारों के, कानबाई के, आदिवासियों के और गुलाबाई के गीत लोकगीतों के अंतर्गत आते हैं। पोवाडा, कीर्तन, तमाशा, लावणी, भारूड, गौळण लोकनाट्य, लोकनृत्य आदि भी महाराष्ट्र की लोककला में समाविष्ट हैं। लोकनृत्य में फुगडी झि म्मा, पिंगा, टिपरी, लेझीम, दशावतार, कोलीनृत्य, कुणबीनृत्य, तमाशा का नृत्य, गोंधल आदि का उल्लेख आवश्यक है। लावणी और तमाशा महाराष्ट्र की विशेष लोककला है। इन लोकगीतों में लोकजीवन, लोकसंस्कृति और लोकभाषा का दर्शन होता है। अनेक धार्मिक और सामाजिक रिवाजों का इनसे परिचय होता है। इन लोककलाओं का आविष्कार प्रसंगानुरूप और विशिष्ट प्रकार की वेषभूषा के साथ किया जाता है। इनका अध्ययन 'लोकसाहित्य' में होता है। मनोरंजन, उद्‌बोधन, संस्कृतिदर्शन, लोकशिक्षा आदि इन लोककलाओं के हेतु हैं।

3. मराठी तमाशा - तमाशा एक दृश्य-श्राव्य लोककला का प्रकार है। तमाशा महाराष्ट्र की विशेषता है। तमाशा में लावणी का समग्र रूप में दर्शन होता है। लावणी से तमाशा को आकार प्राप्त होता है। गण, गवळण, शृंगारिक लावणियाँ, भेदिक लावणियाँ, मुजरा आदि का समावेश इस में होता हैं। इस में 'सोंगाड्या' महत्त्वपूर्ण होता है। 'मुजरा' पूरा होने के बाद तमाशा खत्म होता है। जनसाधारण की बौद्धिक भूख पूरी करने का काम तमाशा की लावणी करती है। संस्कृत नाट्य में होनेवाले 'भरतवाक्य' का काम तमाशा में 'मुजरा' करता है। मनोरंजन और शिक्षण इस के उद्देश्य हैं। इस के लावणियों में शृंगार, देवताओं का वर्णन, अध्यात्म, तत्त्वज्ञान आदि का अंतर्भाव होता है। इस में

**ढोलकी, तबला, खंजरी, टाळ, घुँगरू, हार्मोनिअम, तुणतुणे, एकतारी और अन्य तालवाद्यों का प्रयोग होता है।**

# धडा / पाठ 19

## महाराष्ट्राचा सांस्कृतिक गोडवा

विठ्ठल : विश्वदीप, तुझ्या आमंत्रणावरून मी मागच्या वर्षी आसाम फिरलो. यावर्षी तू महाराष्ट्रात चल. जर तू महाराष्ट्रात गेलास तर तुला खूप काही बघायला मिळेल. मी नाही का आसामात केवढं काही पाहिलं! ब्रह्मपुत्रेचं पात्र किती भव्य आहे! जसा काही समुद्रच! कामाख्यादेवीचं सुप्रसिद्ध मंदीरही पाहिलं. अजून काही दिवस आसामात घालवता आले असते तर आणखी छान वाटलं असतं. पण तरीही खूप मजा आली. आता तुझी पाळी-महाराष्ट्रात जायची.

विश्वदीप : अरे, मी मुंबईला आणि पुण्याला जाऊन चुकलो आहे.

विठ्ठल : पण, महाराष्ट्र म्हणजे फक्त मुंबई आणि पुणं नाही. तुम्ही अन्य प्रांतातले लोक हीच चूक करता. मुंबई आणि पुणं पाहिलं तर तुम्हाला वाटतं सगळा महाराष्ट्र पाहिला. पण महाराष्ट्रात बघण्यासारखं आणखीही खूप आहे. संत्र्यांसाठी जगभरात प्रसिद्ध असलेलं नागपूर आहे, सुंदर आणि टिकाऊ चादरींसाठी प्रसिद्ध सोलापूर आहे, नांदेडचा गुरुद्वारा आहे आणि सिंधुदुर्गचा सागरी किल्लाही आहे.

विश्वदीप : मी यावर्षी जाऊ शकलो तर नक्की जाईन. पण तूही माझ्याबरोबर येऊ शकशील नं?

## महाराष्ट्र की सांस्कृतिक मिठास

विठ्ठल : विश्वदीप, तुम्हारे आमंत्रण पर मैं पिछले साल असम घूमा। इस साल तुम महाराष्ट्र चलो. यदि तुम महाराष्ट्र गए तो तुम्हें काफी कुछ देखने को मिलेगा। मैंने नहीं असम में काफी कुछ देखा ब्रह्मपुत्र का पाट कितना विशाल है। जैसे कोई समुद्र ही (हो)। कामख्या देवी का प्रसिद्ध मंदिर भी देखा। यदि कुछ और दिन असम में बिताता तो और भी अच्छा लगता। पर फिर भी बहुत आनंद आया। अब महाराष्ट्र चलने की तुम्हारी बारी है।

विश्वदीप : अरे! मैं तो मुंबई और पुणे जा चुका हूँ।

विठ्ठल : पर महाराष्ट्र का मतलब सिर्फ मुंबई या पुणे नहीं है। आप अन्य राज्यों के लोग यही गलती करते हैं। अगर आपने मुंबई और पुणे देखा तो समझते हो कि पूरा महाराष्ट्र देख लिया। महाराष्ट्र में देखने लायक और भी बहुत कुछ है। संतरे के लिए दुनिया भर में प्रसिद्ध नागपुर है, सुंदर और टिकाऊ चादरों के लिए प्रसिद्ध सोलापुर है। नांदेड़ का गुरुद्वारा और सिंधुदुर्ग का सागर स्थित किला भी है।

विश्वदीप : यदि मैं इस साल जा सका तो ज़रूर जाऊँगा। पर तुम भी मेरे साथ चल सकोगे न?

विट्ठल : मला जमलं तर मी नक्की येईन. पण मला जरी काही कारणामुळे येणं शक्य झालं नाही तरी तू नक्की जा.

विश्वदीप : असं कसं? तू आला नाहीस तर गंमत येणार नाही. पण समजा, तू जर येऊ शकणारच नसशील तर मला तिथल्या एखाद्या चांगल्या यात्रा कंपनीचा पत्ता देऊ शकशील का?

विट्ठल : अरे, का नाही देऊ शकणार? तू मला आसामच्या फिरतीच्या वेळी केवढी मदत केली होतीस. जर तू मला मदत केली नसतीस तर मी आयुष्यातल्या एका सुंदर अनुभवाला मुकलो असतो.

विश्वदीप : मग सांग महाराष्ट्रात केव्हा जाणं बरं पडेल?

विट्ठल : तू आता गेलास तर रत्नागिरीचा सुप्रसिद्ध हापूस आंबा खाऊ शकशील. भाद्रपदात गेलास तर महाराष्ट्रातला गणेशोत्सव तुला बघायला मिळेल. लोकमान्य टिळकांनी समाजप्रबोधना साठी सार्वजनिक गणेशोत्सव सुरू केला होता. तो त्यांनी सुरू केला नसता तर जनजागृती होऊ शकली नसती.

विश्वदीप : हो, ते खरं आहे. आणि आणखी एक सांगू का? मला माझ्या एक मित्रानं कळवलं आहे की, पुण्याला तर ईद आणि गणेशोत्सव दोन्हीही सगळे मिळून खूप उत्साहानं आणि एकोप्यानं साजरे करतात.

विट्ठल : हो. आणि तू तर मुंबईला पाहिलंच आहेस की, वांद्र्याच्या माऊंटमेरीच्या जत्रेत सगळ्या जातींचे आणि धर्मांचे लोक खूप उत्साहानं भाग घेतात.

विट्ठल : यदि संभव हुआ तो मैं ज़रूर चलूँगा। पर यदि मैं किसी कारण न चल सका तो भी तुम अवश्य जाना।

विश्वदीप : ऐसे कैसे? तुम नहीं चलोगे तो मज़ा नही आएगा। पर समझो, यदि तुम चल ही नहीं सके तो मुझे वहाँ की किसी अच्छी यात्रा - कंपनी का पता दे सकोगे क्या?

विट्ठल : अरे! क्यों नहीं दे सकूँगा? तुमने मेरे असम भ्रमण में मुझे कितनी मदद की थी! यदि तुमने मेरी मदद नहीं की होती तो मैं जीवन के एक बढ़िया अनुभव से वंचित रह जाता।

विश्वदीप : फिर बताओ महाराष्ट्र जाना कब ठीक रहेगा?

विट्ठल : तुम इस समय जाओगे तो रत्नागिरि का प्रसिद्ध हापुस आम खा सकोगे। यदि भादों के महीने में गए तो महाराष्ट्र का गणेशोत्सव तुम्हें देखने को मिलेगा। लोकमान्य तिलक ने समाज में जागृति के लिए सार्वजनिक गणेशोत्सव शुरु किया था। यदि उन्होंने यह नहीं शुरु किया होता तो जन जागृति नहीं हो सकती थी।

विश्वदीप : हाँ, यह तो सच है। एक बात और बताऊँ क्या? मुझे मेरे एक मित्र ने बताया है कि पुणे में तो ईद और गणेशोत्सव दोनों को ही सब मिलकर बड़े उत्साह से और भाईचारे से मनाते हैं।

विट्ठल : हाँ। और तुमने मुंबई में देखा ही है कि बांद्रा की माउंट-मेरी के मेले में सब जातियों के और धर्मों के लोग उत्साह से भाग लेते हैं।

विश्वदीप : बरं, काय रे, महाराष्ट्रात तुम्ही चैत्र शुद्ध प्रतिपदेला 'गुढीपाडवा' म्हणता आणि त्यादिवशी गुढी उभारून नवीन वर्षाचा प्रारंभ करता न?

विट्ठल : हो हो, अगदी बरोबर! त्या दिवशी तू कुठल्याही मराठी माणसाच्या घरी गेलास तर तुला श्रीखंड हमखास मिळेल. आणि महाराष्ट्रातली दिवाळी पण छान असते हं! पूर्ण पाच दिवस! लाडू, चिवडा, चकल्या, सांजोऱ्या, करंज्या, अनारसे, शेव असे खाण्याचे अनेक प्रकार. फटाक्यांची सुंदर आतषबाजी आणि दिव्यांची आकर्षक रोषणाई जर पाहायची असेल तर तुला दिवाळीतच जायला हवं.

विश्वदीप : ध्वनी व वायू प्रदूषण कमी करायचं असेल तर मोठ्या आवाजाच्या आणि जास्त धूर सोडणाऱ्या फटाक्यांवर बंदी हवीच. आणि तशी ती सरकारने घातलीही आहे. तुला ठाऊक आहे न?

विट्ठल : ते मात्र खरं आहे. दिवाळीनंतरचा महाराष्ट्रातला मोठा सण म्हणजे मकरसंक्रांत. त्यावेळी 'तिळगुळ' देतात आणि 'तिळगुळ घ्या, गोडगोड बोला' असं म्हणतात. परस्परसंबंधांतला कटुपणा विसरून स्नेह आणि गोडवा वाढविण्यासाठी तिळगुळ असतो. स्त्रिया त्यादिवशी हळदी कुंकवाचे आयोजन करतात.

विश्वदीप : महाराष्ट्रात होळी साजरी करत नाहीत का?

विश्वदीप : अच्छा, क्यों रे, आप महाराष्ट्र में चैत्र शुक्ल प्रतिपदा को गुड़ी पड़वाँ कहते हैं और उसी दिन 'गुड़ी' फहराकर नया साल प्रारंभ करते हैं न?

विट्ठल : हाँ, हाँ, बिल्कुल ठीक। उस दिन यदि तुम किसी मराठी आदमी के घर गए तो तुम्हें श्रीखंड निश्चय ही मिलेगा। और महाराष्ट्र में दिवाली भी बढ़िया होती है। पूरे पाँच दिनों तक। लड्डू, चिवड़ा, चकली, मीठी रोटी, गुझिया, अनारसे, सेव आदि अनेक खाद्य पदार्थ (बनाए जाते है)। यदि पटाखों की सुंदर आतिशबाजी और दीपों की जगमगाहट देखनी हो तो तुम्हें दिवाली पर ही जाना चाहिए।

विश्वदीप : यदि ध्वनि और वायु प्रदूषण कम करना हो तो ज्यादा आवाज वाले और ज्यादा धुआँ छोड़ने वाले पटाकों पर प्रतिबंध लगाना ही चाहिए। सरकार ने ऐसा प्रतिबंध लगाया भी है। तुम्हें मालूम है न?

विट्ठल : वह बाकी सच है। दिवाली कें बाद महाराष्ट्र का प्रमुख त्योहार है मकर-संक्रांति। उस समय 'तिल-गुड़' देते हैं और 'तिल-गुड़ लो, मीठा-मीठा बोलो', कहते हैं। आपसी संबंधो में कटुता भूलकर स्नेह और मिठास बढाने के लिए तिल-गुड़ होता है। स्त्रियाँ इस दिन हल्दी-कुमकुम का आयोजन करती हैं।

विश्वदीप : महाराष्ट्र में होली नहीं मनाते हैं क्या?

विट्ठल : मनाते हैं न। पर हमारी होली उत्तर

विठ्ठल : करतात नं, पण आमची होळी उत्तर भारतांतल्या होळीपेक्षा थोडीशी वेगळी असते. होळीला पुरणाची पोळी असते. तू पुरणपोळी खाल्ली आहेस का?

विश्वदीप : हो. माझ्या दिल्लीतल्या एका मराठी मित्राकडे मी पुरणपोळीची चव घेऊन चुकलो आहे.

विठ्ठल : चल तर मग. महाराष्ट्रात जायच्या तयारीला सुरवात कर आणि तिथल्या पुरणपोळीची चव घे.

भारत की होली से थोड़ी सी भिन्न होती है। होली पर पूरन-पोली बनाते हैं। तुमने पूरन-पोली खाई है क्या?

विश्वदीप : हाँ, दिल्ली के एक मराठी मित्र के घर मैं पूरन-पोली का स्वाद ले चुका हूँ।

विठ्ठल : चलो फिर, महाराष्ट्र चलने की तैयारी शुरु करो और वहाँ की पूरन पोली का स्वाद लो।

शब्दार्थ

| | |
|---|---|
| आमंत्रण | निमंत्रण |
| बघायला मिळेल | देखने को मिलेगा |
| केव्हढं काही | काफी कुछ |
| भव्य | विशाल |
| जाऊन चुकलो | जा-चुका |
| चादर | चादर |
| येऊ शकणे | आ सकना |
| गंमत | मज़ा |
| फिरती | दौरा, भ्रमण |
| मुकलो असतो | वंचित हना |
| समाज प्रबोधन | सामाजिक जागृति |
| सार्वजनिक | सार्वजनिक |
| एकोप्यानं | मिलजुलकर |
| गुढीपाडवा | वर्ष प्रतिपदा, वर्ष का पहला दिन |
| गुढी | गुड़ी |
| हमखास | जरूर, निश्चय ही |
| करंज्या | गुझिया |
| बंदी | प्रतिबंध |
| वेगळी | अलग |
| चव | स्वाद |

## अभ्यास

I नीचे दिए गए प्रश्नों के उत्तर दीजिए।

1) विठ्ठलने आसाममध्ये कायकाय पाहिले?
2) महाराष्ट्रात पुण्यामुंबईशिवाय बघण्यासारखं कायकाय आहे?
3) भाद्रपदात महाराष्ट्रात कोणता उत्सव साजरा करतात?
4) सार्वजनिक गणेशोत्सव कोणी व का सुरू केला?
5) महाराष्ट्रात सणांच्या दिवशी केल्या जाणाऱ्या विविध खाद्यपदार्थांची नावे सांगा.
6) महाराष्ट्रातील दिवाळीबद्दल थोडक्यात माहिती सांगा.
7) 'गुढीपाडवा' कधी असतो? त्या दिवशी काय करतात?

II नीचे दिए गए वाक्यों में रेखांकित शब्दों के स्थान पर कोष्ठक में दिए गए शब्दों का प्रयोग कर दो-दो नये वाक्य बनाइए।

1) ब्रह्मपुत्रेचं पात्र किती भव्य आहे! (मोठे, विस्तीर्ण)
2) महाराष्ट्रात बघण्यासारखं आणखीही खूप आहे. (पाहण्यासारखं दाखवण्यासारखं)
3) लोकमान्य टिळकांनी समाजप्रबोधनासाठी सार्वजनिक गणेशोत्सव सुरू केला. (जनजागृतीसाठी, एकात्मतेसाठी)
4) दिवाळीत फटाक्यांची आतषबाजी असते. (दिव्यांची रोषणाई, मजाच मजा)
5) प्रदूषण कमी करण्यासाठी मोठ्या आवाजाच्या फटाक्यांवर बंदी हवी. (जास्त धूर सोडणाऱ्या, प्रदूषण वाढविणाऱ्या)

III उपयुक्त अक्षर जोडकर दिए गए शब्द पूरे कीजिए।

1) आ … … णा … रू …
2) … हा रा … त
3) ब … ण्या … र …
4) … यु … त …
5) ग णे … … …
6) मा … ट … री …
7) गु … पा ड …
8) … र ण … …
9) त … … ला

IV नीचे दिए गए शब्दों में से उन शब्दों का चयन कीजिए जो पाठ में आए हैं।

आसाम, पंजाब, महाराष्ट्र, ब्रह्मपुत्रा, मंदीर, पुणे, नाशिक, प्रसिद्ध, जर, गावात, मानवता, शिकवण, संत, ज्ञानेश्वर, तर, नामदेव, शकशील, मुकलो असतो,

हापूस आंबा, सफरचंद, लोकमान्य टिळक, महात्मा गांधी, गणेशोत्सव, दसरा, करंज्या, भेळ, चहा, चिवडा, आतषबाजी, प्रदूषण, घेऊन चुकलो आहे, आई, बाबा, जरी, तरी.

V प्रत्येक शब्द समूह में जो शब्द उस वर्ग का न हो उसे पहचानिए।

1) मुंबई, नागपूर, ब्रह्मपुत्र, सोलापूर, सिंधुदुर्ग.
2) दिवाळी, गुढीपाडवा, गणेशोत्सव, ईद, पुरणपोळी.
3) फटाके, सांजोऱ्या, करंज्या, अनारसे, चकल्या.
4) मराठी, मित्र, दिवाळी, पुरणपोळी, गुढी.
5) सुंदर, आकर्षक, जर, चांगली, सुप्रसिद्ध.

VI कोष्ठक में दिए गए शब्द से संबंधित शब्दों को बताइए।

1.
1) कामख्यादेवी, सावली, गणपती, पाणी (मंदीर)
2) स्वच्छ, नांदेड, नागपूर, नवा, सोलापूर, सिंधदुर्ग (महाराष्ट्र)
3) दिवाळी, गुढीपाडवा, गणेशोत्सव, आंबा, ईद, फुल (दसरा)
4) लाडू, चकल्या, पाच, सांजोऱ्या, करंज्या, फटाके (अनारसे)
5) चिवडा, जाणे, शेव, दुपार, रोषणाई, आतषबाजी (दिवाळी)

VII नीचे दिए गए शब्दों के लिए इस पाठ में आए विशेषण शब्द कोष्ठक में दिए गए हैं। उन्हें उपयुक्त शब्दों के साथ जोड़िए।

पात्र, मंदीर, यात्राकंपनी, अनुभव, दिवाळी, रोषणाई
(सुंदर, आकर्षक, भव्य, चांगली, सुप्रसिद्ध, छान)

VIII उदाहरण के अनुसार दिए गए शब्दों को सही क्रम में रखकर वाक्य बनाइए।

*उदाहरण:* नाहीस, जर, गावाला, गेला, तू, माझ्याकडे, तर ये,
तू जर गावाला गेला नाहीस तर माझ्याकडे ये.

1) आला, जर, पहिला, पेढे, मी, तर, नंबर, माझा, वाटीन,
2) सुट्टी, जर, येईन, तर, शाळेला, मिळाली, तुमच्याकडे, मी,
3) बागेत, नाही, लवकर, जरी, तरी, घरी, आपण, तू, आलास, जाणार
4) विद्यार्थ्याने, अभ्यास, जर, परीक्षेत, नाही, नाही, उत्तम, मिळणार, यश, तर, केला, त्याला
5) पिकं, जर, पाऊस, येतील, चांगली, तर, पडला, भरपूर,

IX कोष्ठक में दिए गए हिंदी शब्दों के समानार्थक मराठी शब्दों का प्रयोग कर वाक्य पूरे कीजिए।

1) मी संपूर्ण महाराष्ट्र ......... . (देख चुका हूँ।)
2) तू माझ्याबरोबर ......... . (खेल सकोगे क्या?)

3) विजयने ताजमहाल पाहिला नसता तर तो जीवनातील एका सुंदर अनुभवाला ....... . (वंचित रह जाता।)
4) महाराष्ट्रात सगळे सण उत्साहाने ......... . (मनाते हैं।)
5) महाराष्ट्रात तू सागरी किल्लाही ........ . (देख सकोगे)

IX उदाहरण के अनुसार कोष्ठक में दिए गए शब्दों में से उपयुक्त शब्द चुनकर वाक्य पूरे कीजिए।

*उदाहरण:* तू हे काम करू......... . (शकेल, शकतील, शकतोस)
तू हे काम करू <u>शकतोस</u>.

1) मी यावर्षी गाण्याच्या क्लासला जाऊ ........ नाही. (शकणार, शकेल, शकतो)
2) राहुल, तुझा पुण्यातील पत्ता कळवू ......... काय? (शकते, शकतो, शकशील)
3) सायली आजारपणामुळे स्पर्धेत भाग घेऊ ........ नाही. (शकते, शकली, शकतील)
4) कष्ट केल्याशिवाय यश मिळू ........ नाही. (शकत, शकशील, शकतो)
5) द्वितीय भाषा शिकणारे विद्यार्थी व्याकरणात चुका करू ....... . (शकते, शकणार, शकतात)

X उदाहरण के अनुसार नीचे दिए गए वाक्यों के निषेधवाचक रूप बनाइए।

*उदाहरण:* जर तू आलास तर मी येईन.
जर तू <u>आला नाहीस</u> तर मी <u>येणार नाही</u>.

1) जर विद्यार्थ्याने अभ्यास केला तर तो उत्तीर्ण (पास) होईल.
2) प्रत्येकाने प्रयत्न केले तर यश मिळेल.
3) मुलांनी आईवडीलांचं ऐकलं तर त्यांचं कल्याण होईल.
4) जर आपण स्वच्छ राहिलो, तर आपले आरोग्य चांगले राहील.
5) जर मन पावन असेल, तर ईश्वराचे दर्शन होईल.

XI 'जर...तर', 'जरी...तरी' जैसे शर्तसूचक शब्दों का प्रयोग कर तीन-तीन नये वाक्य बनाइए।

XII उदाहरण के अनुसार दिए गए प्रत्येक वाक्य जोड़ी को मिलाकर एक-एक वाक्य बनाईए।

1. *उदाहरण:* तू येशील. मी येईन.
<u>जर</u> तू येशील <u>तर</u> मी येईन.

1) मी म्हैसूरमध्ये राहीन. मी वृंदावन गार्डन पाहीन.
2) मला बक्षिस मिळेल. मी सर्वांना पेढे देईन.

3) सर्वजण प्रयत्न करतील. ते काम लवकर होईल.

2. *उदाहरण:* ती गात आहे. तू ऐक.
जर ती गात असेल तर तू ऐक.
1) ती पुरणपोळी करते आहे. तू बासुंदी कर.
2) तो दूध आणतो आहे. तू चहा कर.
3) ते शेक्सपिअरवर लिहित आहेत. तू कालिदासावर लिही.

3. *उदाहरण:* तिला लिहायचं आहे. तिला लिहू दे.
जर तिला लिहायचं असेल तर तिला लिहू दे.
1) त्यांना नाटकात काम करायचं आहे. त्यांना नाटकात काम करू दे.
2) आता विजयला खेळायचं आहे. त्याला खेळू दे.
3) गीता आणि सुनीताला सहलीला जायचं आहे. त्यांना सहलीला जाऊ दे.

4. *उदाहरण:* तू खेळणार नाहीस. मी खेळणार नाही.
जर तू खेळणार नाहीस तर मी खेळणार नाही.
1) निलेश चित्रपटाला जाणार नाही. नितीनसुद्धा जाणार नाही.
2) तुम्ही ते काम करणार नाहीत. तोपण ते काम करणार नाही.
3) शिक्षक विद्यार्थांना रागावणार नाहीत. विद्यार्थी अभ्यास करणार नाहीत.

5. *उदाहरण:* तू मला ते काम सांगितले नाही. मी ते काम केले नाही.
जर तू मला ते काम सांगितले असते तर मी ते केले असते.
1) तू मला बोलवले नाहीस. मी आलो नाही.
2) मी बाजारात गेलो नाही. मी फळे व भाजी आणली नाही.
3) ती 'नेट' ची परीक्षा उत्तीर्ण झाली नाही. ती प्राध्यापक झाली नाही.

पढिए और समझिए।

मराठी काव्याचं अध्ययन करायचं तर सुरवात ज्ञानेश्वरीपासून करायला हवी. ज्ञानेश्वरीकर्ते ज्ञानेश्वर हे जसे थोर कवी होते, तसेच ते महान् चिंतक पण होते. ज्ञानेश्वरीची काव्यात्मकता अजोड आहे. जर श्रेष्ठतेच्या आधारावर जगातल्या सगळ्या साहित्यकृतींची यादी करायचं ठरवलं, तर ज्ञानेश्वरीचं स्थान पहिल्या दहातच असेल.

ज्ञानेश्वरांचे वडील विठ्ठलपंत. त्यांनी तारुण्यात संन्यास घेतला होता. पण नंतर आपल्या गुरूंच्या आज्ञेवरून त्यांनी पुन्हा गृहस्थाश्रमात प्रवेश केला. त्यामुळे चिडलेल्या रुढीवाद्यांनी त्यांचा व त्यांच्या कुटुंबाचा खूप छळ केला. त्यांना वाळीत टाकलं. अखेर, विठ्ठलपंत व त्यांची पत्नी या दोघांनीही जलसमाधी घेतली. ज्ञानेश्वर व त्यांची भावंडं पोरकी झाली. ज्ञानेश्वर जरी या सगळ्या कटू अनुभवांतून गेले होते तरी त्यांनी अमृतासारख्या मधुर वाङ्मयाची निर्मिती केली. सर्वसामान्य वाचक इ

**ाानेश्वरीमधल्या गहन तत्त्वज्ञानाला समजू शकला नाही, तरी तिच्यातला रसाळपणा त्याच्या ह्रदयाला भिडतो.**

**शब्दार्थ**

| | |
|---|---|
| थोर | महान |
| काव्यात्मकता | कविता का भाव |
| अजोड | बेजोड़ |
| यादी | सूची बनाना |
| चिडलेल्या | चिढ़े हुए |
| रुढीवादी | रुढ़िवादी |
| छळ करणे | तकलीफ देना |
| वाळीत टाकणे | बहिष्कृत करना |
| पोरकी | अनाथ |
| रसाळपणा | कविता का रस |
| ह्रदयाला भिडणे | ह्रदय छू लेना |

**अभ्यास**

I नीचे दिए गए प्रश्नों के उत्तर मराठी में दीजिए।

1) ज्ञानेश्वरी कोणी लिहिली?
2) ज्ञानेश्वरांच्या वडिलांचं नाव काय होतं?
3) रुढीवाद्यांनी त्यांचा छळ का केला?
4) सर्वसामान्य माणसाला ज्ञानेश्वरीतलं गहन तत्त्वज्ञान समजलं नाही, तरी त्यांतलं काय आवडतं?
5) जगातल्या साहित्यकृतींची श्रेष्ठतेच्या आधारावर यादी करायचं ठरवलं तर काय होईल?

II उपयुक्त अक्षर जोडकर शब्द पूरे कीजिए।

1) अ ... य ...
2) ... ने श्व ... ... र्ते
3) गृ ह ... श्र ... त
4) रू ढी ... ... नी
5) वा ... म या ...

III नीचे दिए गए शब्दों में से पाठ (पढिए और समझिए) में आए शब्दों को पहचानिए और बताइए।
काव्याचं, कथेचं, अध्ययन, कवी, चिंतक, विठ्ठलपंत, शिक्षक, संन्यासधर्म बहिणी, पत्नी, तिखट, मधुर, उदारता, रसाळपणा, हृदयाला.

IV हिंदी में अनुवाद कीजिए।

दोन आक्टोबर हा दिवस संपूर्ण भारतात 'गांधी जयंती' म्हणून साजरा करतात. हा एक महत्त्वाचा राष्ट्रीय सण आहे. या दिवशी आमच्या शाळेत अनेक उत्तम कार्यक्रम साजरे करतात. त्याचा मी अनेकदा अनुभव घेऊन चुकलो आहे. गांधी जयंतीला सर्व विद्यार्थी व शिक्षक सभागृहात जमतात. व्यासपीठावर गांधीजींची प्रतिमा किंवा फोटो ठेवलेला असतो. त्याला प्रमुख पाहुणे व मुख्याध्यापक पुष्पहार व खादीची माळ अर्पण करतात. कार्यक्रमाची सुरूवात गांधीजींच्या 'वैष्णव जन तो तेणे कहिए' या प्रसिद्ध भजनाने होते. मराठीचे शिक्षक स्वागतपर भाषण करतात. त्यानंतर प्रमुख पाहुणे गांधीजींच्या विचारांवर व कार्यकर्तृत्वावर व्याख्यान देतात. जर आपण हे व्याख्यान ऐकले तर आपल्या ज्ञानात भर पडते. म्हणून सर्वजण हे व्याख्यान लक्षपूर्वक ऐकतात. काही विद्यार्थी प्रश्न विचारतात आणि प्रमुख पाहुणे त्याला उत्तरे देतात. या चर्चेनंतर विद्यार्थी आपले कार्यक्रम सादर करतात. देशभक्तीपर गीते, गांधीजींची भजने म्हणतात. गांधीजींच्या जीवनावरील प्रसंगांचे नाट्यरूपांतर सादर करतात. गांधीजींच्या व गांधीजींविषयीच्या ग्रंथांचे वाचन विद्यार्थी करतात. काही शिक्षक 'माझे सत्याचे प्रयोग' या गांधीजींच्या आत्मकथेचे वाचन करतात. जर विद्यार्थ्यांची इच्छा असेल तर ते सुद्धा गांधीजींबद्दल बोलू शकतात. मी देखील अनेकदा असे बोलून चुकलो आहे. यानंतर मुख्याध्यापक अध्यक्षीय भाषण करतात. यानिमित्ताने होणाऱ्या सूतकताईच्या स्पर्धेत मला अनेकदा पारितोषिकेही मिळाली आहेत. कार्यक्रमाच्या शेवटी हिंदीचे शिक्षक आभारप्रदर्शन करतात. त्यानंतर सर्व विद्यार्थ्यांना खाऊ वाटतात. शेवटी सर्वजण राष्ट्रगीत म्हणतात. या दिवशी आपण जर गैरहजर राहिलो तर या सुंदर कार्यक्रमांपासून, व्याख्यानांपासून आपण वंचित राहातो. राष्ट्रपिता महात्मा गांधींनी सत्य व अहिंसा ही तत्त्वे सांगितली आहेत. त्यांनी दिलेला 'खेड्याकडे चला' हा संदेश आजही उपयुक्त आहे. गांधीजी साध्या सोप्या भाषेत खूप उच्च विचार व तत्त्वज्ञान मांडतात. जर आपण त्यांच्या तत्वांनुसार जगलो तर भारत जगाचे नेतृत्व करू शकेल.

V मराठी में अनुवाद कीजिए।

महाराष्ट्र में गणेशोत्सव बड़ी धूमधाम से मनाते है। यह पर्व भादों की शुक्ल चतुर्थी से लेकर चतुर्दशी तक मनाते है। दस दिनों तक हर जगह साहित्य, संगीत और सांस्कृतिक कार्यक्रमों की धूम होती है। गणेशजी की प्रतिमा विशेष रूप से तैयार किए गए पंडालों में रखते है। पंडालों को खूब सजाते हैं। झाँकियाँ देखने के लिए लोगों की भीड़ उमड़ती है। लोगों का उत्साह और उल्लास देखते ही बनता है। दस दिनों के

बाद प्रतिमाओं को विसर्जित करते हैं। सब ओर सुनाई पड़ता है - "गणपति बाप्पा मोरया, पुढच्या वर्षी लवकर या"।

VI अपने राज्य के किसी प्रसिद्ध त्योहार पर एक छोटा अनुच्छेद मराठी में लिखिए।

## टिप्पणियाँ

I इस पाठ में निम्नलिखित वाक्यप्रकारों का प्रयोग किया है।

1) जर तू महाराष्ट्रात गेलास, तर तुला खूप काही बघायला मिळेल.
यदि तुम महाराष्ट्र गए तो तुम्हें काफी कुछ देखने को मिलेगा।

2) मुंबई आणि पुणं पाहिलं तर तुम्हाला वाटतं सगळा महाराष्ट्र पाहिला.
यदि तुमने मुंबई और पुणे देख लिया तो तुम्हें लगता है कि तुमने पूरा महाराष्ट्र देख लिया।

3) मी यावर्षी जाऊ शकलो तर नक्की जाईन.
यदि मैं इस साल जा सका तो जरूर जाऊँगा।

4) तू आता गेलास तर रत्नागिरीचा सुप्रसिद्ध हापूस आंबा खाऊ शकशील.
यदि तुम इस समय तो रत्नगिरि का प्रसिद्ध हापुस आम खा सकोगे।

5) (तू) भाद्रपदात गेलास तर महाराष्ट्रातला गणेशोत्सव तुला बघायला मिळेल.
अगर तुम भादों के महीने में गए तो तुम्हें महाराष्ट्र का गणेशोत्सव देखने को मिलेगा।

उपर्युक्त वाक्यों में देखा जाता है कि मराठी में हिंदी के "यदि ...... तो" के प्रयोग वाले शर्तसूचक वाक्यों के लिए "जर ...... तर" इन अव्ययों का प्रयोग होता है। इस प्रयोग द्वारा एक वाक्यांश में क्रिया का घटना दूसरे वाक्यांश के क्रिया के घटने पर निर्भर होना व्यक्त किया जाता है।

ध्यान में रखिए कि कभी कभी वाक्यांश से "जर ....." का प्रयोग प्रत्यक्ष रूप से न हो कर, अनुस्यूत होता है।

II नीचे दिए गए वाक्यों को देखिए।

1) अजून काही दिवस आसामात घालवता आले असते तर आणखी छान वाटलं असतं.
यदि कुछ और दिन असम में बिताता तो और भी अच्छा लगता।

2) जर तू मला मदत केली नसतीस तर मी आयुष्यातल्या एका सुंदर अनुभवाला मुकलो असतो.
यदि तुमने मेरी मदद नहीं की होती तो मैं जीवन के एक बढ़िया अनुभव से वंचित रह जाता।

3) जर लोकमान्य टिळकांनी गणेशोत्सव सुरु केला नसता तर जनजागृती होऊ शकली नसती.
यदि लोकमान्य तिलक ने गणेशोत्सव नहीं शुरु किया होता तो जन जागृति नहीं हो सकती थी।

उपर्युक्त "हेतु हेतुमद-भूतकालिक" वाक्यों का, संबंध अनिवार्य रूप से भूतकाल से होता है तथा उन में प्रत्यक्ष में नही हुए, नही किए गए क्रियाकलापों के परिस्थितिओं का तथा उन के परिणाम/फलरूप क्रियाओं तथा परिस्थितिओं का जिक्र होता है।

III नीचे दिए हुए प्रयोगों पर ध्यान दीजिए।

1) मला जरी काही कारणामुळे येणं शक्य झालं नाही तरी तू नक्की जा.
यदि मैं किसी कारण न चल सका तो भी तुम अवश्य जाना।

2) जरी तू माझ्याकडे आलीस तरी मी तुला भेटणार नाही.
यदि तुम मेरे पास आई भी तो मैं तुम्हें नहीं मिलूँगी।

हिंदी के "यदि-तो भी" "यद्यपि -" "तथापि" जैसे प्रयोग वाले वाक्यों के समान इन वाक्यों में "जरी" - और "तरी" के द्वारा वाक्यांशों को जोडा जाता है। इन के द्वारा एक वाक्यांश में दिए गए क्रिया तथा परिस्थिति का और दूसरे में अनपेक्षित परिणाम का संकेत दिया जाता है।

IV नीचे दिए गए प्रयोगों पर ध्यान दीजिए।

1) मी यावर्षी जाऊ शकलो तर नक्की जाईन.
यदि मैं इस साल जा सका तो जरूर जाऊँगा।

2) तू ही माझ्याबरोबर येऊ शकशील नं?
तुम भी मेरे साथ चल सकोगे न?

3) पण मला काही कारणामुळे जाणं शक्य झालं नाही तरी तू जा.
यदि मैं किसी कारण न जा सका तो भी तुम अवश्य जाना।

4) समजा तू येऊ शकणारच नसशील तर मला तिथल्या एखाद्या चांगल्या यात्रा कंपनीचा पत्ता देऊ शकशील का?
समझो, यदि तुम चल ही न सके तो मुझे वहाँ की किसी अच्छी यात्रा-कंपनी का पता दे सकेंगे क्या?

5) तो (गणेशोत्सव) त्यांनी (लोकमान्य टिळकांनी) सुरू केला नसता तर जनजागृती होऊ शकली नसती.

यदि उन्होंने यह नहीं शुरु किया होता तो जन जागृति नहीं हो सकती थी।

इन वाक्यों में "शक" क्रिया रूप तथा उस से बने हुए कृदन्तशब्दरूपों का प्रयोग किया गया है। हिंदी के "सक" (सकना) अर्थ में इस का प्रयोग होता है।

क्रिया के मूलरूप मे 'ऊ' प्रत्यय लगाकर उस के बाद "शक" के निम्न लिखित रूपों का प्रयोग कर शक्यता बोधक वाक्य बनते हैं।

| | | *एकवचन* | *बहुवचन* |
|---|---|---|---|
| *उत्तमपुरुष* | *(पु.)* | मी जाऊ शकतो. | आम्ही/आपण जाऊ शकतो. |
| | *(स्त्री.)* | मी जाऊ शकते. | |
| *मध्यमपुरुष* | *(पु.)* | तू जाऊ शकतोस/शकतेस. | तुम्ही/आपण जाऊ शकता. |
| *अन्यपुरुष* | *(पु.)* | तो जाऊ शकतो. | ते जाऊ शकतात. |
| | *(स्त्री.)* | ती जाऊ शकते. | त्या जाऊ शकतात. |
| | *(नपुं.)* | ते जाऊ शकते. | ती जाऊ शकतात. |

*भूतकाल:*

| | | |
|---|---|---|
| *उत्तमपुरुष* | मी जाऊ शकलो/शकले. | आम्ही/आपण जाऊ शकलो. |
| *मध्यमपुरुष (पु.)* | तू जाऊ शकलास. | तुम्ही/आपण जाऊ शकलात. |
| *(स्त्री.)* | तू जाऊ शकली. | तू जाऊ शकलीस. |
| *अन्यपुरुष (पु.)* | तो जाऊ शकलास. | ते जाऊ शकले. |
| *(स्त्री.)* | ती जाऊ शकली. | त्या जाऊ शकल्या. |
| *(नपुं.)* | ते जाऊ शकले. | ती जाऊ शकली. |

*भविष्यकाल:*

| | | |
|---|---|---|
| *उ.पु.* | मी जाऊ शकेन. | आम्ही/आपण जाऊ शकू. |
| *म.पु.* | तू जाऊ शकशील. | तुम्ही/आपण जाऊ शकाल. |
| *अ.पु.* | तो/ती/ते जाऊ शकेल. | ते/त्या/ती जाऊ शकतील. |

V नीचे दिए गए प्रयोगों पर ध्यान दीजिए।

1) अरे! मी मुंबईला आणि पुण्याला जाऊन चुकलो आहे.
   अरे! मैं तो मुंबई और पुणे जा चुका हूँ।
2) मी पुरणपोळीची चव घेऊन चुकलो आहे.
   मैं पूरन पोली का स्वाद ले चुका हूँ।

इन वाक्यों में हिंदी के "चुका (हूँ)" के अर्थ में 'चुक' क्रियारूप का प्रयोग किया गया है। "आहे" क्रियारूप के उपयुक्त प्रयोगों के साथ इस का प्रयोग पूर्ण भूतकाल यानि की किसी भी क्रिया के पूर्णतः हो जाने के अर्थ में किया जाता है। इस में पुरुषलिंगवचन वाचक प्रत्यय लगते हैं।

| *उदाहरण:* | | *एकवचन* | *बहुवचन* |
|---|---|---|---|
| *उत्तमपुरुष* | *(पु.)* | मी हापूस आंब्याची चव घेऊन चुकलो आहे. मैं हापुस आम का स्वाद ले चुका हूँ. | आम्ही/आपण हापूस आंब्याची चव घेऊन चुकलो आहोत. हम हापुस आम का स्वाद ले चुके हैं। |
| | *(स्त्री.)* | मी हापूस आंब्याची चव घेऊन चुकले आहे. मैं हापुस आम का स्वाद ले चुकी हूँ। | |
| *मध्यमपुरुष* | *(पु.)* | तू हापूस आंब्याची चव घेऊन चुकला आहेस. तुम हापुस आम का स्वाद ले चुकेहो। | तुम्ही/आपण हापूस आंब्याची चव घेऊन चुकला आहात. आप हापुस आम का स्वाद ले चुके हैं। |
| | *(स्त्री.)* | तू हापूस आंब्याची चव घेऊन चुकली आहेस. तुम हापुस आम का स्वाद ले चुकी हो। | |
| *अन्यपुरुष* | *(पु.)* | तो हापूस आंब्याची चव चुकला आहे. वह हापुस आम का स्वाद ले चुका है। | ते हापूस आंब्याची चव घेऊन चुकले आहेत. वे हापुस आम का स्वाद ले चुके हैं। |
| | *(स्त्री.)* | ती हापूस आंब्याची चव घेऊन चुकली आहे. वह हापुस आम का स्वाद ले चुकी है। | त्या हापूस आंब्याची चव घेऊन चुकल्या आहेत. वे हापुस आम का स्वाद ले चुकी हैं। |
| | *(नपुं.)* | ते हापूस आंब्याची चव घेऊन चुकले आहे. | ती हापूस आंब्याची चव घेऊन चुकली आहेत. |

विशेष ध्यान दीजिए की "चुक" क्रियारूप का मराठी में दूसरा अर्थ भी है - "गलती करना" "भूल करना"।

VI हळदीकुंकू: 'हळदीकंकू' महाराष्ट्र की एक सांस्कृतिक परंपरा है। स्त्रियाँ मकरसंक्रांति जैसे पर्व पर सुहागनों को घर बुलाती हैं। उनके माथेपर 'हळदीकुंकू' (हल्दी और कुमकुम) लगाती हैं। अपने से उम्र में बड़ी सुहागनों के चरण छूती हैं। नारियल, सुपारी हल्दी-गाँठ, रूपया (पैसे), बादाम, खुरमा और चावल, गेहूँ या चना

**आदि चीजें या इन में से कुछ चीजें सुहागन के पल्लू में डालती हैं। इसे 'ओटी भरणे' कहते हैं। इस 'हळदीकुंकू' की परंपरा के साथ-साथ जब कोई सुहागन घर आती है तब भी उसके माथेपर हल्दी-कुमकुम लगाकर उसे बिदा करते हैं।**

# धडा / पाठ 20

## देणगी चिपकोची!

पांडे : तू इतकं चांगलं हिंदी कसं बोलतोस?

बापट : अरे, ही चिपकोची देणगी आहे.

पांडे : चिपकोची देणगी?

बापट : हो ना! चिपको आंदोलन त्यावेळी नुकतंच सुरू झालं होतं. आम्ही पंधरावीस जणांनी त्याची पूर्ण माहिती मिळवायचं ठरवलं. सबंध गढवालची भटकंती केली. आम्ही अलकनंदेच्या किनाऱ्यावरील गावन् गाव भटकत असू. त्याचवेळी हिंदी शिकलो. बेधडक बोलायचो. चुकलो तर चुकलो. खरं सांगायचं तर प्रेमाची, माणुसकीची भाषा एकच असते. मग तो गढवाल असो किंवा महाराष्ट्र असो.

पांडे : ते खरं आहे. पण मग परत आल्यावर चिपको आंदोलनाच्या बाबतीत काय करत असता?

बापट : आम्ही मग महाराष्ट्रतही चिपको आंदोलन सुरू केलं.

पांडे : ते कसं?

बापट : आम्ही जंगलातल्या वस्त्यांमधे जायचो. लोकांना जंगलांचं महत्त्व पटवून द्यायचो.

पांडे : भाषणं द्यायचात?

बापट : छे रे! आम्ही गावकऱ्यांत मिसळायचो. आमच्यापैकी कुणी चित्रं काढी, कुणी गाणी म्हणी, कुणी फोटो काढी, कुणी नुसतेच गावकऱ्यांशी गप्पा मारत असे. आमच्यातल्या मुली तर गावातल्या बायकांशी दुधात पाणी मिसळल्यासारख्या एकरूप व्हायच्या।

## चिपको की देन!

पांडे : तुम इतनी अच्छी हिंदी कैसे बोलते हो?

बापट : अरे, यह चिपको की देन है।

पांडे : चिपको की देन?

बापट : हाँ, न। चिपको आंदोलन तब शुरु ही हुआ था। हम कोई पंद्रह बीस लोगों ने उसके विषय में पूरी जानकारी प्राप्त करने की ठानी। पूरे गढ़वाल का चक्कर लगाया। अलकनंदा के किनारे के गाँव-गाँव (हम) घूमा करते थे। उसी समय हिंदी सीखी। बेधड़क बोलते थे। भूल हो गई तो हो गई। सच तो यह है कि प्रेम की, या मानवता भाषा एक ही है। फिर चाहे वह गढ़वाल हो या महाराष्ट्र हो।

पांडे : यह तो सच है। पर वापस आने के बाद चिपको आंदोलन के बारे में क्या करते रहते हो?

बापट : हमने फिर महाराष्ट्र में भी चिपको आंदोलन शुरु किया।

पांडे : वह कैसे?

बापट : हम जंगल की बस्तियों में जाया करते थे। लोगों को जंगलों का महत्त्व समझाते थे।

पांडे : भाषण दिया करते थे?

बापट : नहीं रे। हम गाँव वालों से हिल-मिल जाया करते थे। हम में से कुछ (लोग) चित्र बनाया करते थे, कुछ (लोग) गाना गाया करते थे, कुछ (लोग) फोटो खींचा करते थे और कुछ जाकर गाँव वालों के साथ बातें किया करते थे। हमारे साथ की लड़कियाँ तो गाँव की स्त्रियों के साथ ऐसे घुल-मिल गईं जैसे दूध में पानी।

पांडे : त्याचा परिणाम व्हायचा?

बापट : भरपूर! झोपलेले गावकरी पटापट जागे व्हायचे. सगळीकडे जंगलवासियांचा अनुभव तोच असायचा. त्यांची दुःखही तीच असायची आणि समस्याही त्याच असायच्या. त्यामुळे स्थळकाळाची बंधनं गळून पडायची.

पांडे : इसका असर होता था?

बापट : पूरा-पूरा। सोए हुए ग्रामवासी फटाफट जागृत हो जाते थे। हर जगह के वनवासियों का अनुभव तो एक जैसे ही होता था। उनके दुख भी वही होते थे और समस्याएँ भी वही होती थी। इसलिए स्थानकाल के बंधन टूटते जाते थे।

पांडे : मी तुमच्या पथनाट्याबद्दलही ऐकलं आहे.

बापट : आमची पथनाट्ये तर फारच प्रभावी ठरली. आम्ही बोलत बोलत गावातली माहिती गोळा करायचो. त्यावरच उत्स्फूर्त संवाद तयार करायचो. चिपको आंदोलनातील झाडं वाचवायचे नाना उपाय त्यांना नाटकांतून सांगायचो. सर्वात जास्त प्रभाव पडायचा तो बायकांवर!

पांडे : मैंने तुम्हारे नुक्कड़ नाटकों के बारे में भी सुना है।

बापट : हमारे नुक्कड़ नाटक बहुत ही प्रभावी सिद्ध हुए। हम बोलते बोलते गावँ की पूरी जानकारी इकट्ठी कर लेते थे। उसी के ऊपर ही हम फौरन संवाद गढ़लिया करते थे। चिपको आंदोलन के पेड़-पौधे बचाने के नाना प्रकार के उपाय हम नाटकों द्वारा बताया करते थे। सबसे अधिक प्रभावित हुआ करती थीं महिलाएँ।

पांडे : हल्ली तुम्ही काय करीत असता? अजूनही तुम्ही जंगलात जात असता का? तुमचं आंदोलन चालू आहे का?

बापट : हो-हो! अजूनही चालूच आहे. सगळे आपापल्या कामात मग्न असतो तरीही महिन्या दोन महिन्यातून एखादी वारी असतेच जंगलात.

पांडे : आज कल आप क्या करते रहते हो? आप अभी भी जंगल में जाते रहते हो क्या? आपका आंदोलन चालू है क्या?

बापट : हाँ-हाँ! आज भी चल रहा है। हम सभी अपने अपने कामों में व्यस्त रहते हैं। फिर भी महीने-दो महीने में जंगल का एक चक्कर अवश्य ही लगा लेते हैं।

पांडे : पुढच्या वेळेपासून मलाही सांगत जा. मीही येत जाईन तुमच्याबरोबर. चिपको आंदोलनाचं काम करत जाईन. त्यातून मला मानसिक समधानही मिळत जाईल.

पांडे : अगली बार से मुझे भी बताया करो। मैं भी तुम्हारे साथ आया करूँगा। चिपको आंदोलन का काम किया करूँगा। उससे मुझे मानसिक समाधान भी मिलता रहेगा।

शब्दार्थ

| | |
|---|---|
| बोलतोस | बोलते हो |
| देणगी | देन |
| आंदोलन | आंदोलन |
| नुकतेच | तब ही |
| माहिती | जानकारी |
| मिळवायचं ठरवलं | प्राप्त करने की ठानी |
| भटकंती | भटकन |
| त्याच वेळी | उसी समय |
| बेधड़क | बिना झिझक |
| चुकले तर चुकलो | भूल हो गई तो हो गई |
| खरं सांगायचं तर | सच तो यह है |
| माणुसकीची | मानवता की |
| मग | फिर |
| खरं | सच |
| परत | वापस |
| काय करत असता | क्या करते रहते हो |
| आम्ही | हमने |
| सुरुं केलं | शुरु किया |
| ते कसं | वह कैसे |
| वस्ती | बस्ती |
| लोकांना | लोगों को |
| भाषण देणे | भाषण देना |
| छे रे | नहीं भाई/नहीं रे |
| मिसळणे | हिलमिल जाना, घुलमिल जाना |
| चित्र काढणे | चित्र बनाना |
| गाणी गाणे | गाने गाना |
| दुधात पाणी | दूध में पानी |
| सारख्या | के समान |
| एकरूप होणे | एकरूप होना |
| परिणाम | असर |
| झोपलेले | सोये हुए |
| पथनाट्य | नुक्कड़ नाटक |
| ऐकलं आहे | सुना है |
| प्रभावी | प्रभावकारी |
| माहिती | जानकारी |
| सर्वात जास्त | सबसे अधिक |
| चालू असणे | चालू रहना |
| मग्न | व्यस्त |
| वारी | परिक्रमा |

## अभ्यास

I खालील प्रश्नांची उत्तरे द्या.

1) बापट चांगलं हिंदी का बोलू शकत होते?
2) बापट आणि त्यांच्या मंडळींना 'चिपको' आंदोलना बद्दलची माहिती मिळविण्यासाठी कुठे कुठे भटकावे लागले?
3) गढवालची भटकंती करून परत आल्यावर बापटांनी काय केलं?
4) गावातील लोकांना झाडांचं महत्त्व बापट व मंडळी कशा तऱ्हेने समजावून सांगत असत?

II पाठ वाचून खाली दोन भागात दिलेल्या वाक्यांशांच्या योग्य जोड्या लावून वाक्ये बनवा.

| | |
|---|---|
| चिपको आंदोलन | महत्त्व पटवून द्यायचो. |
| अलकनंदेच्या किनाऱ्यावरील | खूप मिसळायचो. |
| माणुसकीची भाषा | नाटकातून सांगायचो. |
| लोकांना जंगलाचं | गाव न् गाव भटकलो. |
| झाडं वाचवायचे उपाय | नुकतंच सुरु झालं होतं. |
| आम्ही गावकऱ्यांत | एकच असते. |

III अधोरेखित शब्दाबद्दल कंसात दिलेल्या शब्दांची योग्य रूपे वापरून वाक्ये बनवा.

1) मी रोज शाळेत जायचो. (झोप), (खेळ)
2) मी रोज लवकर झोपायची. (ऊठ), (जेव)
3) तू वह्या आणायचीस. (ने), (पाड)
4) तू सारखा पडायचास. (रड), (हस)
5) आपण/आम्ही भरभर जेवायचो. (चाल), (आवर)
6) आपण/तुम्ही कधीकधी यायचात. (रागव), (खेळ)
7) रमा स्वयंपाक करायची. (बिघडव), (सांड)
8) राम सायकल चालवायचा. (पाड), (पळव)
9) मांजर झाडाखाली बसायचं. (झोप), (खेळ)
10) रमाबाई लवकर झोपायच्या. (ऊठ), (जा)
11) रामभाऊ भरभर चालायचे. (बोल), (जेव)
12) मांजरं सारखी भांडायची. (खेळ), (झोप)

IV उदाहरणानुसार खालील वाक्ये नकारार्थी करा.

*उदाहरण:* मी गावाला जायची. मी गावाला जायची नाही.

1) सुनीता फुलांच्या माळा करायची.
2) मी घराघरांत जायचो.
3) आम्ही गढवालचे अनुभव सांगायचो.
4) मुली गावाशी एकरूप व्हायच्या.
5) आपण गावातली माहिती जमवायचो.

6) रमेश नाटकात काम करायचा.
7) पुरुष बाहेरगावी कामाला जायचे.
8) मुलं पटापट झाडांना मिठ्या मारायची.
9) मूल सारखं रडायचं.
10) तू आमच्यात मिसळायचास.
11) तुम्ही गोष्टी सांगायचात.

V उदाहरणानुसार दिलेल्या प्रत्येक वाक्यापासून दोन दोन परिवर्तित वाक्ये बनवा.

1. *उदाहरण:* तू आमच्यात मिसळलास.
तू आमच्यात मिसळायचास.
तू आमच्यात मिसळत असस.

1) मी बसमधून प्रवास केला.
2) आम्ही नागमोडी पायवाटा तुडवल्या.
3) तू गुडगुडी ओढलीस.
4) एखाद्या गृहिणीने शिवणटिपण केले.
5) बायकांनी दळण कांडण केले.
6) म्हातारा खोकला.
7) पोलिस हतबल झाले.
8) मूल अंगणात खेळले.
9) मुलांनी झाडांना मिठ्या मारल्या.

2. *उदाहरण:* मी लहान असताना कविता केल्या.
मी लहान असताना कविता करी.
मी लहान असताना कविता करायचो.

1) तो गावाला गेला.
2) ती रडली.
3) मी लवकर उठलो.
4) ती प्रत्येक शब्दाला हसली.
5) मी निबंध लिहिले.

VI उदाहरणानुसार खालील वाक्ये नकारार्थी करा.

1. *उदाहरण:* मी गावातली माहिती मिळवत असे.
मी गावातली माहिती मिळवत नसे.

1) तिथे एक म्हातारा राहात असे.
2) मी निसर्ग पाहून मोहून जात असे.
3) बापट खेड्यात फेरी मारत असत.
4) रमा गढवालच्या जंगलात जात असे.

2. *उदाहरण:* मी लहान असताना कविता करी.
मी लहान असताना कविता करीत नसे.
1) तू रोज चित्र काढी.
2) संजय सतत गावाला जाई.
3) बायको धान्य कांडी.
4) मी नेहमी गाणी म्हणी.

3. *उदाहरण:* मी रेल्वेतून प्रवास करायचो.
मी रेल्वेतून प्रवास करीत नसे.
1) सगळे नाटक करायचे.
2) गुरंढोरं कुरणात चरायचे.
3) खेळाडू रोज खेळायचे.
4) ती रोज धावायची.

VII कंसात दिलेल्या क्रियापदाची योग्य रूपे वापरून परिच्छेद पूर्ण करा.

1. आमच्या वर्गात एक मुलगा होता. तो झाडावर खूप उंच ....... (चढ). आम्ही जवळच्या रानात खूप ....... (भटक) वडाच्या झाडावर सूरपारंब्या ..... (खेळ). धडाधड उड्या ...... (मार). एका मुलाला मात्र ...... ...... (ये). तो रडत ...... (बस). आम्ही त्याला कसेबसे झाडावर ...... (चढवा). पण तो पुन्हा पुन्हा ...... . (पड)

2. आम्ही गप्पा ...... ...... (मार), नागमोडी पायवाटा ...... असू. (तुडव) निसर्ग ...... असू (पाह). कधी आजूबाजूच्या झाडांवरची फळं. ..... ...... (खा) त्या झाडाबद्दल माहिती गोळा ...... असू (कर). मजेत ...... ......(हस) मैलन् मैल आम्ही ...... असू (चाल).

VIII उदाहरणानुसार वाक्ये बदला.

1. उदाहरण: मी निबंध लिहितो.
मी निबंध लिहीत असतो.
1) मुलगा पुस्तक वाचतो.
2) मधू शेंगदाण्याचा लाडू खातो.
3) सचिन तेंडुलकर क्रिकेट खेळतो.
4) ते नेहमीच उशिरा येतात.
5) सर्व मुले अभ्यास करतात.

2. उदाहरणानुसार खालील वाक्ये नकारार्थी करा.
*उदाहरण:* मी निबंध लिहीत असतो.
मी निबंध लिहीत नसतो.
1) निलेश रोज चित्र काढीत असतो.
2) विजय सतत पुस्तक वाचत असतो.
3) सर्वजण मैलन् मैल चालत असतात.

**शब्दार्थ**

| | |
|---|---|
| वर्णन | विवरण, वर्णन |
| सार्थ | अर्थ सहित |
| समुद्रपट्टी | समुद्र का किनारा |
| डोंगर | दऱ्या |
| खाई | पहाड़ |
| कडेकपारी | पर्वत-खाई |
| विकास | प्रगति, विकास |
| मूठभर | मुट्ठीभर |
| शक्तीशाली | बलवान, शक्तिशाली |
| तोंड देणे | सामना करना |
| गनिमीकावा | चतुराई |
| कास धरणे | पकड कर रखना |
| साक्ष | गवाही |
| मानबिंदू | मान चिह्न |
| नाव कोरणे | नाम खुदवाना |
| युगायुगांपर्यंत रिकणारी | युगयुगान्तरतक रहनेवाली |
| योद्ध्यांची भूमी | शूरवीरों की भूमि |
| साधुसंतांची | साधुसंतों की |
| पावन | पवित्र |
| वैचारिक संतुलन | विचारोंका संतुलन |
| काळ | जमाना |
| अहर्निश | दिनरात |
| झटणे | कोशिश करना |
| अग्रणी | अग्र-गण्य |
| कैवारी | उध्दारक |
| निखळ | सिर्फ |
| जाळे | जाल |
| कानाकोपरा | कोना-कोना |
| जीवापाड | जानसे जादा |
| नाट्यवेडा | नाटक के शौकीन |
| कणखर | कठिण, सख्त |

**अभ्यास**

I खाली दिलेल्या प्रश्नांची उत्तर घा.

1) महाराष्ट्राचे वर्णन कवीने कसे केले आहे?

2) महाराष्ट्रात कोणकोणत्या नद्यांची सुपीक खोरी आहेत?

3) शिवाजी महाराजांनी कोणत्या प्रकारच्या युद्धाची कास धरली?

4) भारतीय इतिहासांत आपले नाव कुणी कोरून ठेवले आहे?
5) या महाराष्ट्रभूमीला कोणी विचारधन दिले?

II थोड्याश्या फरकाने अर्थ किती बदलतो ते पहा. या सर्व शब्दांचा वाक्यांत उपयोग करा.

पाहणे (देखना) पाहुणे (मेहमान)
दोरा (धागा) दौरा (दौरा)
मजा (मजा) मोजा (मोजा)
किल्ला (किला) किल्ली (चाबी)
वेळ (समय) वेड (पागलपन)

IV उदाहरणासाठी दिलेली तीन वाक्ये वाचा प्रत्येक वाक्यात 'बरोबर' चा अर्थ वेगळा आहे. उदाहरणाप्रमाणे "बरोबरचा" योग्य उपयोग करून खाली दिलेली तीन वाक्ये पूर्ण करा.

1. *उदाहरण:*
1) पाहुण्यांबरोबर आमच्याकडे या.
2) आल्याबरोबर तुमच्याकडे आलो.
3) तुम्ही म्हणता ते बरोबर आहे.

2. 1) नीला ......... सुधा खेळत होती.
2) वाचल्या ......... मला सारं समजलं.
3) तू गणित ......... सोडवलं आहेस.

V उदाहरणानुसार तशीच आणखी दोन-दोन वाक्ये लिहा.

*उदाहरण:* नाटकाशिवाय ......... .........?
नाटकाशिवाय कसला महाराष्ट्र?

1) श्रीखंडपुरीशिवाय ......... .........?
2) मित्राशिवाय ......... ......... ?
3) देवाशिवाय ......... ......... ?
4) खेळाशिवाय ......... .........?

VI कंसात दिलेल्या वाक्प्रचारां पैकी योग्य तो वाक्प्रचार योग्य त्या बदलानिशी वापरून खालील वाक्ये पूर्ण करा.

(एका दगडात दोन पक्षी (मारणे), कास धरणे, साक्ष देणे, तोंड देणे, जेरीस आणणे, नाव कोरणे, रात्र थोडी सोंगे फार, ताव मारणे)

1) घरी गेल्यावर बायकोच्या रागाला ......... लागले.
2) शालिनीने विद्येची ......... म्हणून ती विद्वान झाली.
3) हे पुस्तक आपल्या मैत्रीची ......... .
4) सगळ्यांनीच जेवणावर ......... .
5) आदिवासी बायकांनी अखेर ठेकेदारांना ......... .
6) महात्मा फुल्यांनी इतिहासात आपले ......... .

7) पाऊस पडल्यामुळे बागेला पाणीही मिळालं आणि माझे कष्टही वाचले, म्हणतात ना, ......... .

8) घरातला पसारा आवरायचाय, स्वयंपाक करायचाय आंघोळ व्हायचीय, आणि पाहुणे यायला तीनच तास उरलेत. काय करू? ......... .

V खालील शब्दांचा उपयोग करून वाक्ये बनवा.

(खास, मुद्दाम, बेत, गनिमी कावा, पावनभूमी, अग्रणी, कैवारी, अग्रेसर)

VI डावीकडे दिलेल्या स्तंभातील शब्दांच्या उजवीकडे दिलेल्या स्तंभातील शब्दांशी योग्य जोड्या लवा.

| | |
|---|---|
| ख्यातनाम | कणखर |
| राकट | कोमल |
| नाजूक | सदैव |
| कायम | शुद्ध |
| निखळ | प्रसिद्ध |

VII हिंदीत भाषांतर करा आणि समर्पक शीर्षक द्या.

महाराष्ट्र हा वैविध्याने नटलेला प्रदेश आहे. एका टोकाला कोकण तर दुसऱ्याला विदर्भ. शिवाय मराठवाडा, खान्देश आणि पश्चिम महाराष्ट्र. कोकणाला परमेश्वराने निसर्गसौंदर्याची केवढी मोठी देणगी दिली आहे! एकीकडे सह्याद्रीच उत्तुंग अभेद्य कडे तर दुसरीकडे अत्यंत मनोहर समुद्रकिनारा. तिथे सुंदर पर्वतराजीही आहे आणि नारळीपोफळीच्या बागा पण आहेत. परत, सगळीकडे हिरवळीचे साम्राज्य. कोकणरेल्वेने कोकणवासियांच्या जीवनात मोठीच क्रांती केली आहे. पूर्ण कोकण आता सुलभ यात्रेच्या टप्प्यात आला आहे. कोकणरेल्वेचा प्रवास आहे ही अत्यंत रम्य, नयनांना सुखद. तंत्रज्ञानाच्या दृष्टिकोणातूनदेखील कोकण रेल्वे हे एक आश्चर्य आहे कारण अत्यंत प्रगत विज्ञानाचा या रेल्वेच्या उभारणीत उपयोग करण्यात आला आहे. कोकणपट्टीने केवळ महाराष्ट्रालाच नव्हे तर पूर्ण देशाला अत्यंत उच्च कोटीचे नेते, लेखक आणि कलाकार दिले. टिळक, आगरकर, गोखले, खांडेकर, दांडेकर ही सगळी मंडळी मूळची कोकणातलीच. विदर्भाबद्दल बोलायचे तर तोही कुठल्याही बाबतीत कमी नाही. मग, कोणी हे मान्य करो अथवा न करो. अत्यंत सुपीक आणि सधन असा हा प्रदेश आहे. असे म्हणतात की, विदर्भातले रामटेक म्हणजेच कालिदासाच्या मेघदूतांतला रत्नगिरी आहे. इन्दुमती, दमयंती आणि रुक्मिणी या खरे म्हणजे विदर्भकन्याच. संत एकनाथांचे पैठण आणि शिवाजीचे गुरु असलेल्या रामदासस्वामींचे जांब मराठवाडयात आहे, तसाच जायकवाडीचा प्रकल्पपण तिथली प्रकल्पाच्या पाण्यावरली म्हैसुरच्या वृंदावनगार्डनच्या धर्तीवरची नृत्य करणारी कारंजी रमणीय आहेत. पैठणच्या पैठणी साड्यांचे मनोहारी रंग, सुंदर नाजूक जरकाम आणि कलाबनुचे काम यांनी मोहित न झालेली स्त्री विरळा.

खान्देशाबद्दल बोलयचं तर जळगाव-भुसावळच्या केळ्यांनी आणि नाशिकच्या द्राक्षांनी ज्याच्या तोंडाला पाणी सुटत नाही असा माणूस कुठे भेटणार नाही. खान्देशातील अमळनेर ही सानेगुरुजींची कर्मभूमी. मराठीच्या सुप्रसिद्ध कवयित्री बहिणाबाई चौधरी आणि बालकवी हे खान्देशचेच.

पश्चिममहाराष्ट्राबद्दल तर बोलायलाच नको कारण अनेक महान संतांची, वीरांची आणि साहित्यिकांची ती जन्मभूमी व कर्मभूमी होती.

भारतातल्या एकूण बारा ज्योतिर्लिंगांपैकी पाच एकट्या महाराष्ट्रात आहेत-ती म्हणजे भीमाशंकर, परळी-वैजनाथ, औंढया-नागनाथ, वेरुळचा घृष्णेश्वर आणि त्र्यंबकेश्वर. औरंगाबादचा बिबीका मकबरा आणि दौलताबादचा किल्ला हेही फार प्रसिद्ध आहेत. एकूण काय, महाराष्ट्रावर परमेश्वाराची फार कृपा आहे हेच खरे!

VIII मराठीत भाषांतर करा.

महाराष्ट्र हमारे देश का एक औद्योगिक और सांस्कृतिक राज्य है। हम जब महाराष्ट्र का नाम लेते हैं, तब हमारे सामने बाल गंगाधर तिलक का आदर्श आता है। वे महाराष्ट्र के ही नहीं बल्कि पूरे भारत के महान व्यक्ति थे।

समाजसुधार के क्षेत्र में आगरकर महोदय का नाम सबसे उपर है। उन्होंने स्वतंत्रता आंदोलन और समाज सुधारों का सूत्रपात किया। गाँधी जी, गोपाल कृष्ण गोखले जी को अपना प्रेरणा पुरुष एवं आदर्श मानते थे।

महाराष्ट्र के ही एक और विभूति का नाम हमें याद रखना चाहिए। वह है भारतीय संविधान के शिल्पकार डॉ.बाबासाहब आंबेडकर, तिलक और डॉ.भीमराव आंबेडकर महाराष्ट्र के महान पुरुष थे।

दलितों के उद्धार के लिए डॉ.आंबेडकर और महात्मा गाँधी का प्रयास महत्त्वपूर्ण है। डॉ.आंबेडकर के समान ही ज्योतिबा फुले का नाम भी दलितों के उत्थान के लिए बहुत प्रेरक है। ज्योतिबा फुले ने नारीशिक्षा और अछूत्तोद्धार के लिए बहुत प्रयास किए किन्तु उन्हे समाज का पूरा-पूरा सहयोग नही मिला। अपने शिक्षा आंदोलन में उन्हें बहुत कठिनाइयों का सामना करना पड़ा किन्तु उन्होंने कभी हिम्मत नहीं हारी।

महाराष्ट्र जिस प्रकार महापुरुषों के लिए प्रसिद्ध है उसी प्रकार प्राकृतिक सौंदर्य के लिए भी।

यह वीरों का राज्य है। शिवाजी और तानाजी इस महान वीरभूमि के ही सपूत थे।भारत वासियों को अपने इस महान राज्यपर गर्व है।

IX कंसांत दिलेल्या शब्दांमधून योग्य शब्द शोधून खालील उतारा पूर्ण करा.

(छान, शिकत, संधी, करायला, प्रदेश, जा, ठिकाण, पाहता, दगडात, थोडी, नाही)

मी महाराष्ट्रातला दौरा ......... आलो आहे. मी जेव्हा मराठी ......... होतो तेव्हाच रवल होतं की मराठी बोलणाऱ्यांचा ......... महाराष्ट्र पहायचाच. आज ......... मिळाली. काय हो तिवारी, तुम्ही तर मराठी ......... बोलता. मोहन, तू पाहुण्यांना महाबळेश्वरला घेऊन ......... . एकीकडे थंड हवेचे ......... पहायला मिळेल आणि दुसरीकडे प्रतापगड ही ......... येईल. एकाच ......... दोन पक्षी. मला मात्र एवढा वेळ ......... . रात्र ......... सोंगं फार.

X भारताच्या महाराष्ट्राशिवाय दुसऱ्या कुठल्याही राज्याबद्दल एक छोटा निबंध लिहा.

## टिप्पणियाँ

I नीचे दिए गए वाक्यों की ओर ध्यान दीजिए।

1) मी मराठी शिकलो आणि ठरवलं की महाराष्ट्र पहायचाच. (मैं मराठी सीखा और तय किया महाराष्ट्र देखना ही है।)
2) मी मुंबईला होतो म्हणून बोलायला शिकलो मराठी (मैं मुंबई में था, इसलिए सीखा मराठी।)
3) मला दाखवायला आवडलं असतं सगळं पण मला एवढा वेळ नाही. (मुझे सभी दिखाना अच्छा लगता था पर मेरे पास इतना समय नही।)
4) मल वेळ नाही म्हणून मी त्यांना पुण्याजवळचा सिंहगड दाखवीन. (मेरे पास समज नही इसलिए मैं उन को पुणे के पासवाला सिंहगड दिखाऊँगा।)
5) "देह जावो अथवा रहो" - "देह जाए, या रहे"
6) मी त्यांना कोल्हापूरची महालक्ष्मी दाखवीन. शिवाय, महाराष्ट्राची सांस्कृतिक राजधानी पुणं दाखवीन. (मैं उन्हें कोल्हापूर की महालक्ष्मी दिखाऊँगा, इस के अलावा, महाराष्ट्र की सांस्कृतिक राजधानी पुणे दिखाऊँगा।)

जब इस तरह की संरचना बनाई जाती है जिस में एक वाक्यांश दूसरे के अधीन न हो और दोनो ही मुख्य अथवा प्रधान हो तो, उसे "संयुक्त वाक्य कहते हैं। इस में दो या अधिक वाक्य प्रधानत्व बोधक उभयान्वयी अव्ययों द्वारा जोडे जाते हैं। मराठी में ऐसे मुख्य अव्ययों की सूची नीचे दी गई है।

आणि (और), व (और), नि (और), अन् (और), न् (और), आणखी (और), आणिक (और) - ये सब समुच्चयबोधक अव्यय हैं। वे प्रथम वाक्यांश द्वारा किए हुए कथन में कुछ और ज़ादा जोड देते हैं।

पण, परंतु, परी, बाकी - ये न्यूनत्व बोधक अव्यय हैं जो कि पहिले वाक्यांश में किए गए कथन में कुछ त्रुटियों का बोध कराते हैं।

वा, अथवा, की, किंवा - विकल्पबोधक उभयान्वयी अव्यय - जिनका हिंदी के 'या' के अर्थ में प्रयोग किया जाता है।

म्हणून, सबब, याकरिता, यास्तव - ये परिणामबोधक अव्यय पहिले वाक्यांश में दिए गए क्रिया के परिणाम का बोध कराते हैं।

II नीचे दिए गए वाक्यों को देखिए।

1) ज्या प्रदेशांत जायचं त्या प्रदेशाची भाषा आली तर फारच मजा येईल. (जिस प्रदेश में जाना है उस प्रदेश की भाषा आती हो तो मजा आएगा।)
2) यांना जितकी होतील तितकी ठिकाणं दाखविणार आहे. (इन्हें जितनी जगह सकती है, उतनी दिखाऊँगा।)

3) महाराष्ट्र जेवढा किल्ल्यांसाठी प्रसिद्ध आहे, तेवढाच अजिंठा - वेरूळ साठी ही प्रसिद्ध आहे. (महाराष्ट्र जितना किलो के लिए प्रसिद्ध है उतना ही अजंता एलोरा के लिए भी मशहूर है।)

4) महाराष्ट्र पाहण जितकं महत्त्वाचं तितकंच महाराष्ट्रीयन जेवणही महत्त्वाचं आहे. (महाराष्ट्र देखना जितना महत्त्वपूर्ण है, उतना ही महत्त्वपूर्ण महाराष्ट्र का खाना भी है।)

5) तुम्हाला जर वेळ झाला, तर पाहुण्यांना एखादं मराठी नाटक दाखवा (यदि आप के पास समय हो, तो मेहमान को एक मराठी नाटक दिखाइए।)

उपर्निदिष्ट वाक्यों में भी दो या अधिक वाक्यों को जोड दिया गया है। लेकिन ध्यान दीजिए कि इन जोड दिए गए वाक्यों में एक प्रधान तथा दूसरा गौण या प्रधानवाक्य पर आश्रित हैं। अपने आप में इन का पूर्ण अर्थ नही बनता। इस प्रकार से बनाए गए वाक्यों को मिश्र वाक्य कहते हैं। ऐसे वाक्यों में जो शब्द जोडने का कार्य करने हैं वे अक्सर जोडियों में पाए जाते हैं। जैसे कि स्थान सूचक "जिथे-तिथे", दिशा - सूचक - जिकडे - तिकडे, समय - सूचक -जेव्हा-तेव्हा, ज्यावेळी-त्यावेळी, जोपर्यंत-तोपर्यंत, ज्या-प्रमाणे-त्याप्रमाणे, संकेतसूचक - जर-तर, जरी-तरी आदि. इन शब्दों द्वारा जोडे गए कुछ वाक्य नीचे दिए गए हैं।

| | | |
|---|---|---|
| 1) | जिथे तू असशील तिथे मी असेन. | जहाँ तू होगी वहाँ मैं होऊँगा। |
| 2) | जिकडे पहावं तिकडे हिरवळच हिरवळ आहे. | जिधर देखो उधर हरियाली ही हरियाली है। |
| 3) | जर तू अभ्यास केलास तर तुला यश मिळेल. | यदि तुम पढाई करोगे तो तुम सफलता पाओगे। |
| 4) | जरी तू गावाला गेलास, तरी लवकर परत ये. | यद्यपि तुम गाँव जाओ, तो भी समयपर वापस आओ। |
| 5) | ज्यावेळी थंडी पडते त्यावेळी तेल गोठतं. | जब सर्दी पडती है, तब तेल जम जाता है। |
| 6) | जोपर्यंत तू सांगणार नाहीस, तोपर्यंत मला कळणार कसे? | जब तक तुम मुझे कहोगे नही, तबतक मुझे कैसे पता चलेगा? |

III नीचे दिए गए वाक्यों में भी गौणत्वदर्शक उभयान्वयी अव्ययों ने दो वाक्यों को - एक प्रधान और दुसरा आश्रित जोडने का कार्य किया है।

1) तो म्हणाला कि मी हरलो.
उसने कहा की मैं हार गया।
उभयान्वयी अव्यय की - स्वरूप बोधक

2) त्याल बक्षिस मिळालं कारण त्याने चागला निबंध लिहिला.
उस को पुरस्कार मिला क्यों कि उस ने अच्छा निबंध लिखा।
उभयान्वयी अव्यय - कारण = कारण बोधक

3) चांगलं शिक्षण मिळावं म्हणून तो पुण्याला गेला,
अच्छी शिक्षा पानी थी, इसलिए वह पुणे गया।

4) जर-तर तथा जरी-तरी - संकेत सूचक उभयान्वयी अव्यय हैं। इनका उपयोग पहले ही दिखाया गया है।

# धडा पाठ 23

## आपण आणि आपल्या भाषा

गोपाळ : माधवराव, तुम्ही ही बातमी वाचलीत का?

माधव : कोणती? ती भाषेबद्दल आलेली बातमी ?

गोपाळ : या बातम्या रोज रोज वाचताना वाटतं या भाषांच्या प्रश्नावर देशात समस्या तर निर्माण केल्या जाणार नाहीत ना?

माधव : नाही गोपाळराव, तसं होऊ दिलं जाणार नाही. अर्थात तुम्हाला वाटतं ते काही चूक नही.

गोपाळ : भारताची भाषावर प्रांचरचना न केली जाता सुटसुटीत अशा चार किंवा पाच शासकीय विभागात विभागणी केली गेली असती तर हे प्रश्न तरी उद्‌भवले नसते! त्या त्या भागांतील सर्व भाषांना गुण्यागोविंदाने नांदणे भाग पडले असते.

माधव : मला हे तुमचे मत पटत नाही. आपल्या राज्यकारभाराची भाषा मातृभाषाच हवी हे बरोबरच आहे. तेच नैसर्गिकही आहे. त्यामुळे आपल्याकडून हा कारभार चालवला जात आहे असे प्रत्येकाला वाटेल! तसेच भाषावार प्रांतरचनेने निरनिराळ्या प्रादेशिक भाषांची समृद्धीही साधली जात आहे.

गोपाळ : पण मग भाषिकवादांचे काय? भाषाभाषांतील वाढत्या तेढीचे परिणाम काय होत आहेत हे तर रोजच्या पाहण्यात येत आहेत.

## हम और हमारी भाषाएँ

गोपाल : माधवराव, तुमने यह खबर पढ़ी है क्या?

माधव : कौनसी? वह भाषा के बारे में आई हुई खबर?

गोपाल : हाँ। हररोज ऐसी खबरें पढ़कर लगता है कि भाषाओं के इस प्रश्न पर देश में समस्याएँ तो नहीं खडी की जाएँगी?

माधव : नहीं गोपालराव ऐसा नहीं होने दिया जाएगा। हालांकि तुम्हारे सोचने में कोई भूल नही है।

गोपाल : भाषा के आधारपर राज्यों की रचना न करते हुए यदि प्रशासनिक दृष्टि से देश को चार या पाँच हिस्से में बाँट दिया जाता तो ये प्रश्न उठते ही नहीं। तब हर भागों की सभी भाषाओं को साथ साथ प्रेम से रहना ही पड़ता।

माधव : मैं आपसे सहमत नहीं हूँ। अपना राज-काज मातृभाषा में हो यही उचित है। यही स्वाभाविक भी है। इससे हर-एक को लगेगा कि सारा राज-काज उसके द्वारा ही चलाया जा रहा है। भाषावर राज्यों की संरचना से सभी प्रादेशिक भाषाओं का सहज विकास भी हो रहा है।

गोपाल : लेकिन भाषा विवादों का क्या होगा? भाषा भाषा के बीच बढ़ते वैमनस्य के परिणाम तो हररोज दिखाई दे रहे हैं।

माधव : होय, खरं आहे. भाषा अभिमानाला दुरभिमानाचे स्वरूप येत आहे. त्यामुळे हे प्रश्न उग्र स्वरूप धारण करत आहेत. या दुष्ट प्रवृत्तीपासून आपल्या नागरिकांना दूर ठेवण्याचे सर्व प्रयत्न राज्य सरकारांकडून केले गेले पाहिजेत. आपल्यासारख्या सुशिक्षित नागरिकांकडूनही असे प्रयत्न करण्यात आले पाहिजेत.

गोपाळ : मला वाटतं, सहिष्णुता, सहकार्य, बंधुभाव ह्या गुणांचा लोप तर होत नाही ना?

माधव : होय. अशी भीती मला वाटू लागली आहे खरी पण याच गुणांची लोकशाहीच्या पोषणासाठी आवश्यकता आहे. तेव्हा या गुणांचा सर्वत्र आग्रहाने पुरस्कार केला गेला पाहिजे. विशेषतः मुलांना त्यांच्या संस्कारक्षम वयातच या गुणांचं बाळकडू पाजलं गेलं पाहिजे. तसं झालं तरच उद्याच्या समाजाला या प्रश्नांतून मुक्त केलं जाईल.

गोपाळ : म्हणजे शेवटी तुम्ही शिक्षणावर आलात तर!

माधव : होय, सुनागरिकत्वाला सुसंस्कारांचा पाया हवाच. योग्य प्रकारचे शिक्षण हेच तर आपल्या सर्व प्रश्नांचे एकमेव उत्तर आहे.

माधव : यह तो सच है। भाषागत स्वाभिमान धीरे धीरे कट्टरता में बदलता जा रहा है। इसलिए यह समस्या उग्र रूप धारण कर रही है। अपने देशवासियों को इस दुष्प्रवृत्ति से दूर रखने के लिए राज्य सरकारों द्वारा हर तरह के प्रयत्न किए जाने चाहिए। हम जैसे सुशिक्षित नागरिकों के द्वारा भी इस तरह के प्रयत्न किए जाने चाहिए।

गोपाल : मुझे लगता है कि सहिष्णुता, सहकारिता, बंधुत्व आदि गुण लुप्त तो नही होते जा रहे हैं।

माधव : हाँ यह भय तो मुझे भी लगने लगा है। पर लोकतंत्र के पोषण के लिए ऐसे गुणों की आवश्यकता है। अतः इन गुणों को आग्रहपूर्वक बढ़ावा दिया जाना चाहिए। विशेष रूप से बच्चों को बाल्यकाल से ही आयु में ऐसे गुणों की शिक्षा दी जानी चाहिए। तभी कल के समाज को इन प्रश्नों से मुक्त किया जाएगा।

गोपाल : यानि की, आखिर आप शिक्षण पर आ ही गए।

माधव : हाँ। अच्छी नागरिकता को अच्छे संस्कारों की नींव तो चाहिए ही। अच्छी शिक्षा ही हमारी सारी समस्याओं का एकमात्र उत्तर है।

**शब्दार्थ**

| | |
|---|---|
| बातमी | खबर, समाचार |
| अर्थात | मतलब, अर्थात |
| चूक | गलती, चूक |
| विभागणी | विभाजन |
| (प्रश्न) उद्‌भवणे | (प्रश्न) निर्माण होना, उठना, खड़ा होना |
| गुण्यागोविंदाने | राजी खुशी से, सुख पूर्वक |

| | |
|---|---|
| नांदणे | सुखसे रहना (मराठी में नांदणे का अर्थ एक विशेष रूप में होता है। लड़की जब ससुराल में राजीखुशी से रह रही होती है तब कहा जाता है "मुलगी सुखात नांदत आहे." |
| कारभार | कार्यभार, कामकाज |
| साधणे | मुमकिन होना |
| वाद | वाद, वाद-विवाद |
| तेढ | दुश्मनी |
| धारण करणे | धारण करना |
| लोप होणे | नष्ट होना, लुप्त होना |
| भीती | डर, भय |
| शेवटी | आखिर में, अंत में |
| पाया | नींव, बुनियाद |

## अभ्यास

I खालील प्रश्नांची उत्तरे द्या.

1) भाषेच्या प्रश्नाबद्दलच्या बातम्या रोज रोज वाचतांना गोपाळरावांना काय वाटतं?
2) भारताची विभागणी करण्याबद्दल गोपाळरावांचे काय मत आहे?
3) भाषेबद्दलचे प्रश्न उग्र स्वरूप का धारण करत आहेत?
4) लोकशाहीला पोषक असे कोणते गुण आहेत?
5) सुनागरिकत्वाचा पाया कोणता आहे?

II उदाहरणानुसार खालील वाक्यांचे दोन प्रकारे परिवर्तन करा.

*उदाहरण:* मी डबा आणला.
माझ्याकडून डबा आणला गेला किंवा.
माझ्याकडून डबा आणण्यात आला.

1) कामगारांनी जिना पाडला. 2) सरकारने रस्ता रूंद केला.
3) विद्यार्थ्याने धडा वाचला.

2. *उदाहरण:* मी बातमी वाचली.
माझ्याकडून बातमी वाचली गेली.
किंवा माझ्याकडून बातमी वाचण्यात आली.

1) वहिनीने मंगळागौर साजरी केली. 2) शाळेने खंडाळ्याला सहल काढली.
3) मजूरांनी भिंत बांधली.

3. *उदाहरण:* राम औषध प्यायला.
रामकडून औषध प्यायलं गेलं.
किंवा रामकडून औषध पिण्यात आलं.

1) कलाकारांनी नाटक बसवलं. 2) सचिवांनी परिपत्रक पाठविलं.
3) पालकांनी लग्न जुळवलं.

III उदाहरणानुसार खालील वाक्यांमध्ये परिवर्तन करा.

*उदाहरण:* समितीकडून कार्यक्रम केला गेला.
समितीकडून कार्यक्रम करण्यात आला.

1) लेखकाकडून कादंबरी लिहिली गेली.
2) माझ्याकडून पुस्तक वाचलं गेलं.
3) सर्वांकडून आंबे खाल्ले गेले.
4) त्यांच्याकडून चित्रपट पाहिला गेला.

IV डावीकडे दिलेल्या शब्दांच्या उजवीकडे दिलेल्या वाक्यांशांशी योग्य जोड्या लावून वाक्ये तयार करा.

| | |
|---|---|
| चादरी | डॉक्टरकडून देण्यात आलं. |
| कविता | त्याच्याकडून करण्यात आली. |
| फाईली | मुलांकडून लावण्यात आली. |
| औषध | आईकडून निवडले गेले. |
| झाडे | माझ्याकडून धुण्यात आल्या. |
| गहू | शिपायाकडून आणल्या गेल्या. |

V खालील वाक्यात अधोरेखित शब्दाऐवजी दिलेले शब्द वापरून नवीन वाक्ये तयार करा.

रामाकडून आंबा खाल्ला गेला.

बटाटेवडे
चिंच
गोळ्या
केळं
बोरे

VI उदाहरणानुसार खालील वाक्यांचे परिवर्तन करा.

*उदाहरण:* काकांनी धडा वाचला.
काकांकडून धडा वाचला गेला.

1) काकांनी अहवाल लिहिला. 2) काकांनी कविता केली.
3) काकांनी बातमी ऐकली. 4) काकांनी वृत्तपत्र घेतले.
5) काकांनी परिपत्रक वाटले.

VII उदाहरणानुसार खाली दिलेल्या वाक्यांच्या जोडीमधील दुसरे वाक्य पूर्ण करा.

1. *उदाहरण:* मी रोज अभ्यास करतो.
माझ्याकडून रोज अभ्यास केला जातो.

1) मुली वर्गात कविता वाचतात.
मुलीकंडून वर्गात कविता ........ ........ .

2) शिपाई तासातासाने घंटा वाजवतो.
शिपायाकडून तासातासाने घंटा ........ ........ .

3) आई पायाला रक्तचंदनाचा लेप लावेल.
आईकडून पायाला रक्तचंदनाचा लेप ........ ........ .

4) दिग्दर्शक दुष्काळावर माहितीपट तयार करतील.
दिग्दर्शकाकडून दुष्काळावर माहितीपट तयार ........ ........ .

2. उदाहरण : मी ते काम केले.
माझ्याकडून ते काम करण्यात आले.

1) सर्वांनी झाडे लावली.
सर्वांकडून झाडे ........ ........ .

2) विद्यार्थ्यांनी डबे खाल्ले.
विद्यार्थ्यांकडून डबे ........ ........ .

3) आम्ही ते नाटक पाहिले.
आमच्याकडून ते नाटक ........ ........ .

4) तिने सर्व कविता वाचल्या.
तिच्याकडून सर्व कविता ........ ........ .

IIIV खालील संवाद पूर्ण करा.

गुरुजी, सव्वीस जानेवारीच्या कार्यक्रमाची आखणी तुमच्यावर सोपवण्यात आली होती सांगा पाहू, काय काय तयारी करण्यात आली आहे?

.............................................................. .

झेंडावंदन कुणाच्या हस्ते केले जाणार आहे?

.............................................................. .

बक्षिसे बाबूरावांकडूनच दिली जाणार आहेत ना?

.............................................................. .

नाही, नाही पहिला कार्यक्रम पहिलीच्या वर्गातर्फेच सादर करण्यात येऊ दे.

............................................................................................ .

स्वागतगीत दुसरीच्या मुलींकडूनच बसवलं गेलं आहे ना?

.............................................................. .

पण आभार देशपांडे बाईंकडूनच मानले जातील ना?

.............................................................. .

IX उदाहरणानुसार कंसातील शब्दांची योग्य रूपे करून व योग्य क्रमाने ते शब्द ठेवून वाक्ये बनवा.

*उदाहरण:* (मी) (सिनेमा) (पाह) (तो) (ये)
तो सिनेमा माझ्याकडून पाहण्यात आला.

1) (ते) (चित्र) (काढणे) (जा) (एक) (रंगीत)
2) (ये) (पाहणे) (आम्ही) (एक) (चित्रपट) (जुना) (काल) (देवआनंदचा)
3) (तो) (खूप) (चित्रपट) (ही) (दिग्दर्शन) (करणे) (ये) (रहस्यमय)
4) (शाळा) (आखणे) (जा) (कार्यक्रम) (एक)

X उदाहरणानुसार खालील वाक्यांचे परिवर्तन करा.

*उदाहरण:* रामकडून श्लोक म्हटला गेला.
रामने श्लोक म्हटला.

1) मुख्याध्यापकांकडून उद्‌घाटन करण्यात आले.
2) मुलांकडून कार्यक्रम आखले गेले.
3) लोकांकडून मिरवणूक काढली गेली.
4) ज्योतीबांकडून स्त्रीशिक्षणाचा पाया घालण्यात आला.
5) मुलीकडून कामं करण्यात आली.

पढ़िए और समझिए

भाषा आणि राष्ट्रीय एकात्मता

स्वराज्य मिळालं, स्वातंत्र्य मिळालं पण राज्यकारभार परकीय भाषेतच चालवण्यात येत होता. भारतीय भाषांतून राज्यकारभाराच्या मागण्या करण्यात येत होत्या. भाषावर प्रांतरचनेचे वचन देण्यात आले होते. त्या वचनपूर्तीची वाट पाहण्यात येत होती. अखेर पोट्टू श्रीरामलू यांच्या उपोषणाने हा प्रश्न धसास लागला. भारताच्या लोकशाही शासनाकडून भाषावर प्रांतरचना करण्यात आली. पण त्यामुळे प्रश्नांचा निकाल लावला गेला नाही. सरकारला नवनवीन प्रश्नांचा सामना करावा लागला. मराठी भाषिक महाराष्ट्र, कन्नड भाषिक कर्नाटक, तेलुगू भाषिक आंध्र असे प्रांत निर्माण करण्यात आले. सर्व एक भाषिक लोक एकाच प्रांतात येणे शक्यच नव्हते. प्रत्येक प्रांतात निकटवर्ती प्रांतातील भाषिक थोड्या संख्येने राहणे अपरिहार्य होते. या भाषिक अल्पसंख्यांकांचे नवीन प्रश्न निर्माण झाले. सरकारवर अनेक प्रकारचे दबाव आणले जाऊ लागले. आंदोलने करण्यात आली. भाषेमुळे कटुता निर्माण झाली. पण हे काही स्वार्थी लोकांचे काम होते. खरे तर भारतीय लोक कधीही संकुचित मनोवृत्तीचे नव्हते आणि नाहीत. आपण नेहमीच दुसरी भाषा, साहित्य, संस्कृती, वेशभूषेचा आदर करीत असतो. भाषावर प्रांतरचनेमुळे त्यात काहीही फरक पडला नाही. आजही अनेक लोक दुसऱ्या प्रांताची भाषा शिकतात. त्या भाषेतील साहित्यकृतींचे भाषांतर आपल्या भाषेत करतात. राज्य आणि केंद्र सरकारकडूनही अशा प्रकारच्या भाषिक देवाणघेवाणीला प्रोत्साहन देण्यात येते. अनेक तरूण याच दिशेने काम करण्यास उत्सुक आहेत हे

आशादायक आहे. काही लोक भाषेच्या नावावर वाद निर्माण करण्याचा प्रयत्न करतात. परंतु ते यशस्वी होत नाहीत. लोकांना हे माहित आहे की, भाषा परस्परांना जोडणारी असते तोडणारी नव्हे.

शब्दार्थ

| | |
|---|---|
| मागण्या | माँगें |
| करण्यात | करने में |
| देण्यात आले होते | दिया गया था |
| उपोषण | अन्नजल का त्याग |
| धसास लागणे | पूरा करना |
| शासनाकडून | शासन द्वारा |
| निकाल | फल, परिणाम, नतीजा |
| सामना करणे | सामना करना |
| शक्यच नसणे | बस में नहीं होना |
| निकटवर्ती | पासवाले |
| थोडा | कम |
| कटुता | कड़वाहट |
| स्वार्थी | स्वार्थी, खुदगर्ज |
| संकुचित मनोवृत्ती | संकुचित मनोवृत्ति, तंगनज़री |
| आदर करणे | सम्मान करना, आदर करना |
| फरक | फर्क, अंतर, भिन्नता |
| दुसऱ्या | दूसरे |
| साहित्यकृती | साहित्यकृति |
| भाषांतर | अनुवाद |
| देवाणघेवाण | आदानप्रदान, बढ़ावा देना |
| प्रोत्साहन | प्रोत्साहन |
| तरुण | तरुण, युवक, युवा |
| याच दिशेने | इस दिशा मे |
| उत्सुक | उत्सुक, इच्छुक |
| आशादायक | आशाजनक |
| यशस्वी | यशस्वी |
| परस्परांना | आपस में, एक दूसरे को |
| जोडणारी | जोड़नेवाली |
| तोडणारी | तोड़ने वाली |

**अभ्यास**

I खालील प्रश्नांची उत्तरे द्या.

1) स्वराज्य मिळाल्यानंतर लोकांच्या काय मागण्या होत्या?
2) भारतीय लोक कसे आहेत?
3) आजही अनेक लोक काय करतात?
4) केंद्र व राज्यसरकारकडून भाषेच्या बाबतीत काय करण्यात येते?
5) भाषा कशी असते?

II खालील वाक्ये अभ्यासा व कसांतील शब्दांची योग्य रूपे रेखांकित शब्दाऐवजी वापरून वाक्य पूरे करा.

(सगळे, खास, प्रयत्न, वैरी, अखेर, जरा, भीती)

1) मूठभर मावळ्यांच्या साहाय्यने शिवाजीने शत्रूला जेरीस आणले.
2) सरकारने शांततेसाठी खास प्रयास केले पाहिजेत.
3) आज रात्री विशेष पाहुणे येणार आहेत.
4) सर्वत्र भयाचं वातावरण आहे.
5) शेवटी भाषावर प्रांतरचना करण्यात आली.
6) बाळाला थोडा ताप आला आहे.
7) सर्व लोक भयभीत झाले होते.

III योग्य त्या वाक्प्रचारांचे योग्य रूप वापरून खालील वाक्ये पूर्ण करा.

(दबाव आणणे, बाळकडू पाजणे, प्रश्न धसास लागणे, प्रश्नाचा निकाल लागणे, गुण्यागोविंदाने नांदणे, सामना करणे)

1) भारतात सर्व धर्माचे लोक ........ तोच सुदिन!
2) आलेल्या प्रसंगाचा ........ हेच धीराचं लक्षण!
3) देशप्रेमाचे ........ तरच नवी पिढी देशभक्त होईल.
4) अखेर जनतेने सरकारवर ........ .
5) त्या कामगार नेत्याच्या बलिदानाने कामगारांचा ........ .
6) सात वर्षे वाट पाहिल्यावर अखेर त्या ........ .

IV हिंदीत भाषांतर करा आणि समर्पक शीर्षक द्या.

प्रत्येक राज्याचा राज्यकारभार त्या-त्या राज्याच्या भाषेतूनच चालविला गेला पाहिजे. राज्यसरकारची सर्व परिपत्रके, ध्येयधोरणे आणि नियम राज्यभाषेतूनच प्रसिद्ध केले गेले पाहिजेत. कारण राज्यातील बहुसंख्य लोकांकडून ती भाषा बोलली जाते. अनेकांकडून ती वापरली जाते. त्यामुळे सरकारचे नियम इ.सर्व लोकांना समजतील. प्रत्येकाला वाटेल की, आपल्याकडूनच राज्यकारभार चालविला जात आहे. आपल्यालाही राज्यकारभारात सामील करून घेतले गेले आहे असे सर्वांना वाटेल.

त्यामुळे लोकशाही खऱ्या अर्थाने अस्तित्वात येईल. लोकांना राज्यकारभाराबद्दल आत्मीयता वाटेल.

छत्रपती शिवाजी महाराजांनीही आपला राज्यकारभार मराठीतून करण्यासाठी 'राज्यव्यवहारकोश' तयार करवून घेतला होता. लोकमान्य टिळकांकडूनही स्वराज्य, स्वदेश, स्वधर्म आणि स्वभाषा या चार सूत्रांचा पुरस्कार करण्यात आला होता. तसेच स्वातंत्र्यवीर वि.दा. सारकरांकडूनही मराठी भाषाशुद्धीचे खूप प्रयत्न करण्यात आले. आता प्रत्येक राज्याची एक राज्यभाषा आहे. सर्व राज्यकारभार राज्यभाषेतून होतो आहे. महाराष्ट्राची राज्यभाषा मराठी आहे.

राज्यकारभाराबरोबरच शिक्षणही मातृभाषेतूनच दिले गेले पाहिजे. कारण प्रत्येकजण आपले विचार, मते, भावना इ.मातृभाषेतून उत्तम प्रकारे व्यक्त करू शकतो. भावना व विचारांचा हा आविष्कार उत्स्फूर्तपणे मातृभाषेतूनच होत असतो. म्हणूनच मातृभाषा ही मनाची भाषा असते. जर विद्यार्थ्याला मातृभाषेतून शिक्षण दिले तर तो ते उत्तम प्रकारे ग्रहण करू शकतो. परंतु मातृभाषेऐवजी परभाषेतून शिक्षण दिले तर त्याची अवस्था 'हेही नाही आणि तेही नाही' अशी होते. म्हणजे तो धड मातृभाषाही शिकू शकत नाही आणि परभाषाही नीट समजू शकत नाही. मातृभाषेचे संरक्षण व संवर्धन करायचे असेल तर प्रत्येकाकडून मातृभाषाच बोलली गेली पाहिजे. प्रत्येकजण निदान दहावीपर्यंत तरी मातृभाषेतूनच शिकला पाहिजे. प्रत्येकाला मातृभाषेतील पुस्तके उपलब्ध करून दिली गेली पाहिजेत. प्रत्येकाने ती वाचली पाहिजेत. मातृभाषा समृद्ध होण्यासाठी त्यात उत्तमोत्तम ग्रंथरचना केली गेली पाहिजे. विविध भाषांमधील उत्तमोत्तम ग्रंथसंपदा मातृभाषेत म्हणजे मराठीत (माझी मातृभाषा मराठी आहे.) आणली गेली पाहिजे. महाराष्ट्रातील पालकांकडून आपल्या मुलांना मराठीतूनच शिकण्याचा आग्रह झाला पाहिजे. मातृभाषा केवळ साहित्याची भाषा न राहता ज्ञानभाषा झाली पाहिजे. विविध भाषांमधील ज्ञान तज्ज्ञांकडून मराठीत आणण्यात आले पाहिजे. मी मराठीचा, माझ्या मातृभाषेचा पुरस्कार करतो आहे याचा अर्थ मला इतर भाषांबद्दल द्वेष आहे असे नाही. कारण सर्व भाषा परस्परांच्या भगिनी आहेत. त्या सर्वत्र गुण्यागोविंदानेच नांदायला हव्यात. एक मात्र खरे की, माता, मातृभूमी, आणि मातृभाषा महत्त्वाच्या आहेत, वंदनीय आहेत.

V मराठीत भाषांतर करा.

भारत एक विविधरंगी देश है। यहाँ अनेक धर्मों के लोग रहते हैं। सबके रहन-सहन वेशभूषा एवं खानापान भिन्न-भिन्न हैं। सभी लोगों द्वारा अपना स्वतंत्र जीवन निर्वाह किया जाता है।

जिस प्रकार हमारा देश धर्मों और रहन-सहन में विविध रूपी है उसी प्रकार भाषा के रूप में भी विविध रूपी है। इसीलिए भारत को बहुभाषी देश कहा गया है। भारत के हर राज्य की अपनी भाषा है। हरराज्य के निवासियों द्वारा अपनी भाषा बोली जाती है।

हिंदी हमारी राजभाषा है। तथापि संविधान में अन्य भाषाओं को भी सम्मानजनक दर्जा दिया गया है। संविधान के अनुसार केंद्रीय सरकार का काम काज हिंदी में किया जाना चाहिए। जहाँ-जहाँ भी केंद्रीय सरकार द्वारा पत्र व्यवहार किया जाता है वहाँ-वहाँ हिंदी का ही प्रयोग होता है।

राज्यों का कामकाज संबंधित राज्य की राजभाषा में चलाया जाता है। इसलिए हरएक राज्य की स्वीकृत भाषा को भी विकास के लिए पूर्ण अवसर दिया जा रहा है।

राज्यों में वहाँ की ही राजभाषा का प्रयोग होने से वहाँ के नागरिकों को सुविधा हो रही है। राज्य की भाषा के साहित्य का भी विकास हो रहा है। हर राज्य के साहित्यकारों द्वारा अपने-अपने राज्य की भाषा का विकास किया जा रहा है। उस प्रकार जहाँ राज्यों की अलग-अलग भाषाओं का विकास हो रहा है उसी प्रकार अन्य भाषाओं के साथ-साथ हिंदी का भी समान रूप से विकास हो रहा है।

भाषा के इस सामंजस्य द्वारा भारत एक सूत्र में बंधा हुआ है।

VI 'माझी मातृभाषा' या विषयावर मराठींत एक निबंध लिहा.

## टिप्पणियाँ

I इस पाठ में मराठी के 'कर्मवाच्य' का प्रयोग सिखाया गया है। नीचे दिए गए वाक्यों के रेखांकित क्रिया रूपों पर ध्यान दीजिए।

*उदाहरण:*

1) आपल्याकडून हा कारभार चालवला जात आहे असे प्रत्येकाला वाटेल.
हर एक को लगेगा कि सारा राज-काज उसके द्वारा चलाया जा रहा है।
2) या गुणांचा सर्वत्र आग्रहाने पुरस्कार केला गेला पाहिजे.
इन गुणों को आग्रह पूर्वक बढ़ावा दिया जाना चाहिए।
3) भाषावर प्रांतरचना केली गेली.
भाषावार प्रांतरचना की गई। (भूतकाळ)
4) भाषावार प्रांतरचना केली जाते.
भाषावार प्रांतरचना की जाती है। (वर्तमानकाळ)
5) भाषावार प्रांतरचना केली जाईल.
भाषावार प्रांतरचना की जाएगी। (भविष्यकाळ)

उपर्युक्त वाक्यों के रेखांकित क्रियारूपों में मराठी के 'कर्मवाच्य' का प्रयोग किया गया है। मराठी में ऐसे प्रयोगों के लिए हिंदी के समान ही मूल क्रिया के 'भूतकालिक' रूप के बाद 'जा' क्रिया के उपयुक्त रूपों का प्रयोग करते हैं।

2. नीचे दिए गए वाक्यों के रेखांकित क्रिया रूपों पर ध्यान दीजिए।
*उदाहरण:*

1) भाषा भाषांमधील वाढत्या तेढीचे परिणाम काय होत आहेत
हे तर रोजच्या पाहण्यात येत आहेत.
भाषा भाषा के बीच बढ़ते वैमनस्य के परिणाम तो हररोज दिखाई दे रहे हैं।
2) आपल्यासारख्या सुशिक्षित नागरिकांकडूनही असे
प्रयत्न करण्यात आले पाहिजेत.
हम जैसे सुशिक्षित नागरिकों को के द्वारा भी इस तरह के प्रयत्न
किए जाने चाहिए।
3) भाषावार प्रांतरचना करण्यात आली.
भाषावार प्रांतरचना की गई है। (भूतकाळ)
4) भाषावार प्रांतरचना करण्यात येते.
भाषावार प्रांतरचना की जाती है। (वर्तमानकाळ)
5) भाषावार प्रांतरचना करण्यात येईल.
भाषावार प्रांतरचना की जाएगी। (भविष्यकाळ)

उपर्युक्त वाक्यों के रेखांकित क्रिया रूपों में भी मराठी के 'कर्मवाच्य' का प्रयोग किया गया है। मराठी में ऐसे वैकल्पिक प्रयोगों के लिए मूल क्रिया में '-ण्यात' जोड़कर 'ये' (आना) क्रिया के उपयुक्त रूपों का प्रयोग करते हैं।

ध्यान दे कि, मराठी में 'कर्मवाच्य' प्रयोग दो प्रकार से किया जाता है। दोनों प्रकार का कर्मवाच्य समान रूपसे सर्वत्र प्रयुक्त हो सकता है।

मराठी में कर्मवाच्य प्रयोग बनाने के लिए मूल वाक्य के कर्ता को करण कारक का परसर्ग '-कडून' जोड़कर मूल क्रिया के भूतकालिक रूप के साथ 'जा' क्रिया के उपयुक्त रूप का प्रयोग होता है। ऐसे वाक्यों में कर्ता कई बार अभिप्रेत या अस्पष्ट होता है। जब कर्म को प्राधान्य देकर विधान करना होता है या कर्ता स्पष्ट नहीं होता है, या कर्ता का उल्लेख टालना होता है तब ऐसा प्रयोग किया जाता है।

# धडा पाठ 24

## मराठी शिक्षक

गोखले : सर, मी आत येऊ का?

मुख्याध्यापक : या गोखले या. कशी काय वाटली आमची शाळा? आवडली का? आणि तुमचं काम काय म्हणतंय? अरे शंकर, दोन कप चहा पाठवून दे लवकर!

गोखले : शाळा तर खूप आवडली आणि सर तुम्हाला मराठी छान बोलता येतंय की।

मुख्याध्यापक : अहो, गोखले, मी उत्तर कर्नाटकातला. शिक्षणही तिथंच झालं. आता गेली पंचवीस वर्षं मी इथं पुण्यात आहे. म्हणून मराठी येतं. अर्थात तुमच्याइतकं नाही. अजूनही अधूनमधून कन्नड शब्द येतात. गेली दहा वर्षे या कर्नाटक हायस्कूलचा हेडमास्तर आहे. पुन्हा एकदा मातृभाषेच्या सेवेची संधी मिळालीय.

गोखले : सर, थोडी अडचण आहे. मला कन्नड येतं ते बोलण्या समजण्यापुरतं! लिहायला वाचायला येत नाही. इथं मी मराठीचा शिक्षक म्हणून नेमलो गेलोय. पण मुलं सारी कन्नडभाषिक आहेत. बाकी सारे विषय कन्नडमधून शिकतात. त्यांना मराठी शिकताना फार अडचणी येतात.

मुख्याध्यापक : अहो गोखले, ह्या मुलांना

## मराठी शिक्षक

गोखले : सर, क्या मैं अंदर आऊँ?

मुख्याध्यापक : आइए गोखले जी आइए। आपको हमारी पाठशाला कैसी लगी? अच्छी लगी क्या? और आपका काम कैसे चल रहा है? अरे शंकर, जल्दीसे दो कप चाय भिजवाना।

गोखले : पाठशाला तो बहुत अच्छी लगी और सर आप को तो मराठी बहुत अच्छी बोलनी आती है।

मुख्याध्यापक : अरे गोखले जी, मैं मूलतः उत्तर कर्नाटक का। शिक्षा भी वहीं हुई। अब गए पच्चीस सालसे यहाँ पुणे में हूँ। इसलिए मराठी आती है। पर आप की तरह नही। अब भी यहाँ-वहाँ कन्नड़ शब्द आ जाते हैं। पिछले दस सालोंसे कर्नाटक हाइस्कूल का हैडमास्टर हूँ। एक बार फिर मातृभाषा की सेवा करने का अवसर मिला है।

गोखले : सर थोड़ी कठिनाई है। मुझे कन्नड़ तो आती है लेकिन सिर्फ बोलने समझ ाने तक। लिखना, पढ़ना नहीं आता। यहाँ मैं मराठी का शिक्षक नियुक्त किया गया हूँ। पर सभी बच्चे कन्नड़ भाषी हैं। (वे) बाकी के सब विषय कन्नड़ माध्यम से पढ़ते हैं। उन्हें मराठी सीखने में काफी दिक्कतें आती हैं।

मुख्याध्यापक : गोखले, इन बच्चों को मराठी

मराठी अनिवार्य भाषा म्हणून शिकायची आहे. ती या प्रांतात राहतात तेव्हा त्यांना इथली भाषा आलीच पाहिजे.

गोखले : ते खरं आहे. पण त्यासाठी खास तेवढ्यासाठी तयार केलेली पुस्तकंही हवीत. मला अजून तशी पुस्तकं मिळाली नाहीत. शिवाय मला कन्नड भाषा नीट येत नाही. मला जर चांगलं कन्नड येईल तर या विद्यार्थ्यांना मराठी शिकवायल मदत होईल.

मुख्याध्यापक : पण मला वाटतं गोखले, 'बालभारतीनं' अमराठी मुलांना मराठी शिकविण्याकरीता पुस्तकं तयार केलेली आहेत. त्याबद्दल चौकशी करा. आणि इथं 'डेक्कन कॉलेजात' केंद्र सरकारची 'पश्चिम विभागीय भाषा केंद्र' नावाची एक संस्था आहे. तिथंही चौकशी करा. शिवाय 'महाराष्ट्र राज्यभाषा संचालनालयाशी' संपर्क साधा. अरे हो, चहा घ्या.

गोखले : उगीचच त्रास घेतलात. सर, पण माझं कन्नड शिक्षण?

मुख्याध्यापक : अरे तेच तुम्हाला आता सांगणार होतो. म्हैसूरला केंद्र सरकारच्या 'भारतीय भाषा संस्थान'चे 'दक्षिण विभागीय भाषा केंद्र' आहे. तिथं चारही दक्षिण भारतीय भाषा-तमिळ, तेलुगू, कन्नड, मलयाळम या शिकवल्या जातात. हा दहा महिन्यांचा कोर्स आहे. तिथं हायस्कूल-शिक्षकांना कुठल्याही एका भाषेच्या प्रशिक्षणासाठी पाठवता

येतं. तुमची इच्छा असेल तर संस्थेतर्फे

अनिवार्य भाषा के रूप में सीखनी है। वे इस राज्य में रहते हैं इसलिए उन्हें यहाँ की भाषा आनी ही चाहिए।

गोखले : यह तो सच है। लेकिन इसके लिए विशेषरूप से तैयार की गई पुस्तकें चाहिए। मुझे तो ऐसी पुस्तकें नही मिली हैं। इसके अलावा, मुझे कन्नड भाषा अच्छी तरह नहीं आती। यदि मुझे कन्नड भाषा अच्छी तरह आती है तो इन विद्यार्थियों को मराठी सीखाने में मदद होगी।

मुख्याध्यापक : पर गोखले जी, मुझे लगता है कि 'बाल भारती' ने अमराठी बच्चों को मराठी सिखाने के लिए कुछ पुस्तकें तैयार की हैं। उनके बारे में पता कीजिए और यहाँ 'डेक्कन कालेज' में केंद्र सरकार की 'पश्चिम विभागीय भाषा केंद्र' नाम की एक संस्था है। वहाँ भी पूछताछ कीजिए। इसके अलावा 'महाराष्ट्र राज्य भाषा संचालनालय' से भी संपर्क कीजिए। अरे हाँ, चाय लीजिए।

गोखले : आपने बेकार ही कष्ट लिया। हाँ सर पर मेरा कन्नड़ शिक्षण?

मुख्याध्यापक : वही आप से कहने जा रहा था। मैसूर में केंद्र सरकार के 'भारतीय भाषा संस्थान' का 'दक्षिण विभागीय भाषा केंद्र' है। वहाँ दक्षिण भारत की चारों भाषाएँ जैसे तमिळ, तेलुगू, कन्नड़ और मलयाळम सिखाई जाती हैं। यह दस महिनों का पाठ्यक्रम है। वहाँ हाईस्कूलों के शिक्षकों को किसी एक भाषा में प्रशिक्षण के लिए प्रति नियुक्त

किया जा सकता है। यदि आपकी इच्छा हो तो मैं संस्था की ओर से आपको वहाँ

तुम्हाला कन्नड शिकण्यासाठी पाठवण्याची मी शिफारस करीन.

गोखले : वा सर, तुम्ही माझे दोन्ही प्रश्न सोडवलेत. मी 'महाराष्ट्र राज्यभाषा संचालनालय', 'बालभारती' तसेच 'डेक्कन कॉलेजा'त कन्नड भाषिकांना मराठी शिकवण्यासंबधी पुस्तकांची चौकशी करतो. शिवाय तुम्ही कृपा केलीत तर वर्षभरात मला कन्नडही उत्तम शिकता येईल.

मुख्याध्यापक : अहो गोखले, यात माझी कसली कृपा! आपल्या शाळेसाठी ते आवश्यक आहेच. आणि तुम्हीही उत्साही आहात. तुमचा उत्साह असाच राहो. मी पाहतो आणखी तुम्हाला काय मदत करतां येते ते.

गोखले : धन्यवाद सर. येतो. तासाची वेळ झाली.

मुख्याध्यापक : बरं आहे. पुन्हा भेटू तर।

कन्नड सीखने के लिए भेजने की सिफारिश करूँगा।

गोखले : वाह सर! आपने मेरे दोनोंही प्रश्नों का समाधान कर दिया। मैं राज्य-भाषा निदेशालय, 'बालभारती' और 'डेक्कन कॉलेज' में कन्नड भाषियों को मराठी सिखाने के लिए पुस्तकों के बारे में पूछूँगा। इसके सिवाय यदि आपकी कृपा रही तो सालभर में मैं कन्नड़ अच्छी तरह सीख सकूँगा।

मुख्याध्यापक : अजी गोखले जी, इस में मेरी कृपा कैसी? अपने स्कूल के लिए यह आवश्यक ही है। और आप भी उत्साही हैं। आपका उत्साह इसी तरह बना रहे। मैं देखता हूँ कि आपको और मदद कैसे करूँगा।

गोखले : धन्यवाद! चलता हूँ। कक्षा का समय हो गया है।

मुख्याध्यापक : ठीक है। अच्छा फिर मिलेंगे।

शब्दार्थ

| | |
|---|---|
| मी आत येऊ का? | क्या मैं अंदर आ सकता हूँ? |
| कशी वाटली | कैसी लगी |
| पाठवून दे | भेज दो |
| तुमच्याइतकं | तुम्हारे जितना |
| अडचणी | कठिनाइयाँ, अड़चनें |
| बोलणे | बोलना |
| समजणे | समझना |
| समजण्यापुरतं | समझने तक |
| लिहिणे | लिखना |
| वाचणं | पढ़ना |
| आलीच पाहिजे | आनी ही चाहिए |
| तशी पुस्तके | उस तरह की किताबें |
| चौकशी | पूछताछ |

| | |
|---|---|
| उगाच | बिना कारण के |
| सोडवणे | सुलझाना, छुड़ाना |
| उत्तम | अच्छा |
| कृपा | मेहरबानी, कृपा |
| उत्साही | उत्साह से भरपूर, उत्साहित |

## अभ्यास

I धडा वाचून खालील प्रश्नांची उत्तरे द्या.

1) मुख्याध्यापक मराठी चांगली का बोलू शकत होते?
2) श्री. गोखलेंची काय अडचण होती?
3) अमराठी मुलांना मराठी शिकविण्यासाठी कोणी पुस्तके तयार केली आहेत?
4) डेक्कन कॉलेजात कोणती संस्था आहे?
5) म्हैसूरला केंद्र सरकारची भाषेसंबंधी कोणती संस्था आहे?
6) दक्षिण भारतीय भाषा शिकविण्याचा कोर्स किती महिन्यांचा आहे?

II धडा वाचून खाली दिलेली वाक्ये पूर्ण करा.

1) मी गेली दहा वर्षे या कर्नाटक ......... चा ........ आहे.
2) पुन्हा एकदा ........ सेवेची ........ मिळाली.
3) मला कन्नड येतं ते ......... ........ पुरतं!
4) बालभारतीने ......... मुलांना ....... शिकवण्याकरीता पुस्तकं तयार केलेली आहेत.

III एखाद्या विधानाला अनेक प्रकारचे प्रतिसाद मिळतात. खाली दिलेल्या प्रत्येक विधानाला आणखी तीन तीन प्रतिसाद लिहा.

1. काय कशी काय वाटली शाळा?
हं. ठीक आहे.
उत्तम! फारच चांगली आहे शाळा!
इथली शिस्त फार चांगली आहे.
इथून तिथून सगळ्या शाळा सारख्याच!
इतकी भरमसाठ फी घेतात!

2. इथे मराठी अनिवार्य भाषा म्हणून शिकवतात.
का? असलेल्या भाषा कमी होत्या?
इंग्रजीशिवाय दुसरी भाषा हवी कशाला?
मराठी आल्यानं काय मिळणार आहे?
मराठी तर यायलाच हवं.

3. ही शाळा मोठी आहे.
कसली आलीय मोठी?
नुसती शाळाच मोठी. शिस्त अजिबात नाही.
नसायला काय झालं? मुलांकडून भरमसाठ फी घेतात.
नुसती मोठीच नाही. छानही आहे.

IV कंसातील क्रियापदांची योग्य रूपे वापरून वाक्ये पूर्ण करा.

1) सासूबाईंनी ........ ......... गोष्ट सांगितली. (पड)
2) त्यानं घरात पाऊल ........ घर उजळलं. (टाक)
3) उद्या ......... माझ्या वह्या घेऊन ये. (ये)
4) तो रोज सकाळी भूपाळी ........ असतो. (गा)
5) ती रात्री ....... ....... दिवसभरात काय काय झालं ते त्याला सांगते (जेव)
6) तो ....... ....... मला म्हणाला "किती सुंदर दिसतेस तू!" (हस)
7) तो ...... ....... एकदम थांबला. (बोल)
8) घरातून बाहेर ....... जग कसं समजणार? (पड)
9) ते पुस्तक ......... माझं आयुष्यच बदललं. (वाच)
10) ती ......... ....... एवढी मोठी झाली. (बघ)

V उदाहरणात दाखविल्याप्रमाणे 'जा' या क्रियापदाची योग्य रूपे वापरून खाली दिलेल्या वाक्यत्रयींचे सगळे संच पूर्ण करा.

*उदाहरण:* तो जातो. ती जाते. ते जाते.

1) तो गेला. .......... ..........
2) तो जाईल. .......... ..........
3) तो जाणार आहे. .......... ..........
4) तो जाणार होता. .......... ..........
5) तो जाणार असेल. .......... ..........
6) तो जातोय. .......... ..........
7) तो जात होता. .......... ..........
8) तो जात असेल. .......... ..........
9) तो गेलाय. .......... ..........
10) तो गेला होता. .......... ..........
11) तो गेला असेल. .......... ..........
12) तो जात असतो. .......... ..........
13) तो जात असे. .......... ..........
14) तो जाई.......... ..........
15) तो जायचा. .......... ..........

16) तो जात जाईल. .......... ..........

VI अधोरेखित शब्दाऐवजी कंसातील शब्दांचा वापर करून त्यासाठी, योग्य ते बदल करून नवी वाक्ये बनवा.

1) घर मिळेल तेव्हा मी तुला सांगीन. (की)
2) मोठा पाऊस आल्यावर माझी छत्री मोडली. (तेव्हा)
3) एवढा मोठा अपघात झाला पण मला काही झालं नाही. (तरी)
4) पाऊस पडेल म्हणून मी बाहेर गेले नाही. (कारण)
5) तुझं ऐकल्यामुळे माझे पैसे वाचले. (म्हणून)
6) पाऊस पडला की थंडी वाजते. (तर)
7) झाडं तोडली तर पाऊस कमी होतो. (म्हणजे)
8) ठेकेदार आल्यावर बायका सिंहीणी होतात. (आणि)
9) ठेकेदार आले तरी झाडं तोडू शकले नाहीत. (पण)
10) मी झोपडीत शिरल्यावर थक्क झाले. (तेव्हा)

VII कंसांतले शब्द वापरून वाक्ये पूर्ण करा.
(जळत्या, घातलेले, वाहणाऱ्या, झुलते, तळलेल्या, साचलेले, लिहीणारी, पेटती, रांगती, फाडणारी)

1) आम्ही तळ्यात .......... पाणी पाहिले.
2) सगळे कागद .......... मुलगी शाळेत गेली आहे.
3) आईनी .......... पुऱ्या खूप फुगलेल्या होत्या.
4) तू .......... लाकडाजवळ उभा राहू नकोस.
5) तो .......... सिगारेट तोंडात ठेवून हिंडत होता.
6) दिवाळीत नवीन कपडे .......... लोक आमच्या घरी आले.
7) रस्त्यावरून .......... पाण्यात मुलांनी होड्या सोडल्या.
8) आश्रमात जिकडे तिकडे .......... मुलं होती.
9) विद्यार्थ्यांनी प्रवासात .......... मनोरे पाहिले.
10) सर्वात उत्तम कविता .......... मुलगी वर्गात पहिली आली.

VIII पुढील अपूर्ण वाक्ये योग्य ते वाक्यांश जोडून पूर्ण करा.

1) जोपर्यंत कन्नड येणार नाही तोपर्यंत .......... .
2) मला कन्नड आलं की .......... .
3) विद्यार्थाना मराठी शिकायला त्रास होतो कारण .......... .
4) हेडमास्तरांनी मदत केली म्हणून .......... .
5) मला तुम्ही परवानगी दिलीत तर .......... .
6) मला मराठी जितकं चांगलं येतं तितकंच .......... .
7) ज्याप्रमाणे प्रत्येकाला कन्नड यायला हवी त्याप्रमाणे .......... .

8) जेव्हा मला कन्नड येईल तेव्हा .......... .
9) जसजसा मी कन्नड बोलू लागलो तसतसा .......... .
10) मी शाळेत आलो आणि .......... .

IX खालील शब्द योग्य क्रमाने लावून वाक्ये तयार करा.

1) शिक्षकांकडे, आम्हाला, करमलं, आमच्या, पाहुण्यांना, गोव्यात, शिकवणाऱ्या, इतिहास, आलेल्या, वर्गात, खूप.
2) पुण्यातल्या, मित्रांनी, पहिल्या, फिरल्या, बागा, पुण्याला, परवा, मोठ्या, नाटक, काल, सुहासच्या, पाहिलं, आलेल्या, मुंबईहून, रात्री.
3) झालेल्या, गप्पा, खुर्च्यांवर, टी.व्ही. समोर, आपापल्या, ठेवलेल्या, घरी, त्या, नंतर, आणि, पिऊन, बायकांनी, काल, टी.व्ही वर, नाटकाबद्दल, चहा, मारल्या, खूप, बसून, गेल्या.
4) उजेडात, गणपतीपुढे, झगमगत्या, म्हणतो, बाबांनी, आईनी, ठेवतो, केलेले, सजवलेल्या, मोहन, दिव्यांच्या, मोदक, आरती, आणि.
5) इत्यादी, डोलणारी, म्हैसूरहून, गोल गोल, खोलीत, खेळण्यांमधे, उड्या, आणलेला, मांडलेल्या, मोहनच्या, बाहुली, मारणारं, टांगा, लाकडाच्या, माकड, फिरणारी, होती, खेळणी, विमान.

X पुढे दिलेल्या क्रियापदांपासून वर्तमानकाळ, भविष्यकाळ, भूतकाळवाचक वाक्ये स्वतः तयार करा.

1) वहा 2) जळ 3) धाव 4) उगव 5) फिर

## पढ़िए और समझिए

पत्र I माननीय निर्देशक,
भाषा संचालनालय,
महाराष्ट्र राज्य,
सचिवालय, मुंबई.

महोदय,

मी खाली सही करणार विनायक कृष्ण कुळकर्णी पुणे येथील सरकारमान्य कर्नाटक हायस्कूलमध्ये द्वितीय अनिवार्य भाषा मराठी या विषयाचा शिक्षक आहे.

महाराष्ट्र राज्यातील कन्नड अल्यसंख्याकांनी चालविलेली कन्नड माध्यमातून शिक्षण देणारी ही शाळा आहे. या शाळेत राज्य सरकारच्या धोरणानुसार मराठी हा विषय अनिवार्य द्वितीय भाषा म्हणून शिकवला जातो. याबाबत आपणाकडून मार्गदर्शनाची नम्र अपेक्षा बाळगत आहे.

1) कन्नड मातृभाषेच्या शाळेत मराठी ही द्वितीय भाषा म्हणून शिकण्यास योग्य अशी क्रमिक पुस्तके महाराष्ट्र सरकारने वा त्याच्या शिक्षण संचालनालयाने तयार केली आहेत का? असतील तर ती कोठे उपलब्ध होतील?
2) मी मराठी भाषिक असून मला कन्नड पूर्ण स्वरूपात शिकावयाचे आहे या संदर्भात अशा प्रकारच्या प्रशिक्षणासंबंधी आपण मला मार्गदर्शन कराल काय?

आपल्याकडून त्वरित उत्तराची अपेक्षा बाळगणारा,

आपला नम्र,
विनायक कृष्ण कुळकर्णी

23 मार्च 2005
कर्नाटक हायस्कूल
पुणे-2

पत्र II महाराष्ट्र राज्य भाषा संचालनालय सचिवालय मुंबई

प्रिय महोदय,

आपले दिनांक 23 मार्च 2005 चे पत्र मिळाले. आपल्या अडचणींसंदर्भात आपण खालील ठिकाणी संपर्क साधू शकता.

1) कन्नडमधून मराठी भाषा शिकवण्यासाठी 'बालभारती' पुणे व 'पश्चिम विभागीय भाषा केंद्र' डेक्कन कॉलेज, पुणे यांच्याशी संपर्क साधावा. ते तुम्हाला तपशीलवार माहिती देतील.

2) कन्नडेतर भाषिकांना कन्नड शिकवण्याचे 10 महिन्यांचे प्रशिक्षण केंद्र सरकारच्या म्हैसूरस्थित 'भारतीय भाषा संस्थान'च्या 'दक्षिण विभागीय भाषा केंद्रा'तर्फे दिले जाते. या प्रशिक्षणासाठी अनुदानित शाळेत काम करणाऱ्या शिक्षकांना पूर्णपगारी पाठविण्याची तरतूद असून प्रशिक्षणकाळात केंद्र सरकारतर्फे शिष्यवृत्तीही मिळते. याच्या तपशीलाबाबत 'भारतीय भाषा संस्थान, मानसगंगोत्री - म्हैसूर 570 006' च्या संचालकांशी आपण संपर्क साधू शकता.

कळावे.

आपला,

सचिवालय, निदेशक भाषा संचालनालय,
मुंबई. महाराष्ट्र राज्य यांच्याकरता

शब्दार्थ

| | |
|---|---|
| शिकवला जातो | सिखाया जाता है |
| शिकण्यास योग्य | पढ़नेलायक |
| त्वरित | जल्दी से |
| अडचणी | समस्या |
| खालील ठिकाणी | नीचे दिए गए स्थान पर |
| संपर्क साधणे | संबंध स्थापित करना |
| माहिती | जानकारी |
| तर्फे | की ओर से |
| शिष्यवृत्ती | छात्रवृत्ति |

I खालील प्रश्नांची पत्र I च्या आधारे उत्तरे द्या.

1) हे पत्र कोणाला लिहीले आहे?
2) या पत्रात कोणत्या शाळेचा उल्लेख केलेला आहे?
3) राज्यसरकारचे धोरण काय आहे?
4) लेखकाने कोणत्या गोष्टीची मागणी केली आहे?
5) लेखकाची मातृभाषा कोणती आहे?

II खालील प्रश्नांची पत्र II च्या आधारे उत्तरे द्या.

1) हे पत्र कोणाकडून पाठविण्यात आले आहे?
2) या पत्रात कन्नडमधून मराठी शिकविण्यासाठी कुठे संपर्क करायला सांगितले आहे?
3) कन्नडेतर भाषिकांना कन्नड शिकविण्याचा कोर्स कुठे चालविला जातो?
4) या कोर्ससाठी कोणाला पाठवले जाते व त्यांना काय सवलती असतात?
5) कन्नडेतर भाषिकांना कन्नड शिकविण्याच्या कोर्समध्ये प्रवेश घेण्यासाठी कुणाशी संपर्क साधला पाहिजे?

III खाली दिलेल्या वाक्याच्या चार जोड्या नीट पहा. यात अनुक्रमे येणे, वाटणे, चालणे आणि लागणे यांचे दोन दोन अर्थ आहेत.
आणखी चार जोड्या तयार करा.

1. 1) मांजर घरात येतं. 2) मला मराठी येतं.
2. 1) रेखा चटणी वाटते. 2) काय कशी काय वाटते शाळा?
3. 1) सुनिताचा बाळ आता चालतो. 2) मला चहा चालतो.
4. 1) रमाच्या पायाला ठेच लागते. 2) मला सकाळी कॉफी लागते.

IV खालील वाक्ये नीट वाचा. अधोरेखित शब्दाऐवजी कंसातील योग्य तो शब्द घालून वाक्ये पुन्हा लिहा.
(परत, खरं, नीट, इतर, सक्तीची, खूप, सगळी, अवघड, केव्हा, खेरीज)

1) सारी मुलं वर्गात कन्नड बोलतात.
2) मराठी शिकताना फार अडचणी येतात.
3) मराठी ही अनिवार्य भाषा म्हणून शिकवली जाते.
4) मला कन्नड धड बोलताही येत नाही.
5) कन्नड मुलांना मराठी शिकवणे कठीण नाही.
6) तुम्ही म्हणता ते बरोबर आहे.
7) याशिवाय इतरही उपाय आहेत.
8) पुन्हा एकदा यावं लागेल तुम्हाला!
9) कधी येणार आहात?
10) बाकी सारे विषय कन्नडमधून शिकवतात.

V 1) 'क्रम' शब्दापासून "क्रमिक" शब्द बनतो. याचप्रकारे खाली दिलेल्या शब्दांपासून नवे शब्द बनवा.
भाषा, इच्छा, संस्कृती, प्रांत, विचार, समाज, धर्म, सप्ताह, मानस
2) 'भारत' शब्दापासून 'भारतीय' शब्द बनतो, याचप्रकारे खाली दिलेल्या शब्दांपासून नवे शब्द बनवा.
विभाग, जात, प्रांत

VI हिंदी व मराठीमध्ये सारखे असलेले व या धड्यात आलेले सगळे शब्द शोधून लिहा।

VII हिंदीत भाषांतर करा आणि समर्पक शीर्षक द्या.

"शिक्षक हे संस्कृतीचे संरक्षक व संवर्धक असतात" असे जागतिक किर्तीचे तत्त्वज्ञ व आदर्श शिक्षक डॉ.सर्वपल्ली राधाकृष्णन यांनी म्हटले आहे. 'शिक्षक' या शब्दाचा अर्थ काय? शि म्हणजे शिव, शुभ, पवित्र, क्ष म्हणजे क्षमता, आणि क म्हणजे कर्तव्य, कर्म, कल्याण. म्हणजेच इतरांचे, विद्यार्थ्यांचे कल्याण करण्याची क्षमता असणारा शिव म्हणजे शिक्षक. म्हणजेच इतरांचे कल्याण करण्याची क्षमता असणारा आणि तेच ज्याचे कर्तव्य आहे, कर्म आहे तो शिक्षक. शिक्षक कसा असावा? व्रती असावा, व्यासंगी, बहुश्रुत, अभ्यासू, कष्टाळू असावा. नीतिमूल्यांचे पालन करणारा, सेवाभावी असावा. शिक्षकांबद्दल आदर व्यक्त करण्यासाठी पाच सप्टेंबर (डॉ.राधाकृष्णन यांचा जन्मदिवस) हा दिवस 'शिक्षकदिन' म्हणून साजरा करतात आणि गुरूंबद्दल आदर व्यक्त करण्यासाठी आषाढ शुद्ध पौर्णिमा 'गुरूपौर्णिमा' म्हणून साजरी केली जाते.

आपल्या भारतीय संस्कृतीत गुरूचे महत्त्व विशद केले आहे. गुरूला महत्त्वाचे स्थान दिले गेले आहे. आई हा प्रत्येकाचा पहिला गुरू असतो. वडील दुसरे गुरू आणि आईवडिलांनंतर शिक्षक हा प्रत्येकाचा गुरू असतो. प्राचीन काळात धौम्यऋषी-आरूणी, द्रोणाचार्य-एकलव्य श्रीकृष्ण-अर्जुन, समर्थ रामदासस्वामी-शिवाजी महाराज असे अनेक आदर्श गुरूशिष्य होऊन गेले. या सर्वांनी आदर्श गुरू आणि आदर्श शिष्य कसा असावा

हे दाखवून दिले आहे. यांतील प्रत्येक जण खूप कष्ट करत होता, गुरूंची सेवा करत होता आणि असे करता करता शिकत होता. यातूनच गुरूशिष्य परंपरा निर्माण झाली. यांतील प्रत्येक गुरूने आपल्या शिष्याला शिकवून अशा योग्यतेचे बनविले की, त्याने आदर्श निर्माण केला. पूर्वीच्या काळात शिकण्यासाठी शिष्य गुरूकडेच राहायचा. या आदर्शापर्यंत येण्यासाठी प्रत्येकाने किती कष्ट घेतले असतील, शिकताना कायकाय सोसले असेल त्याचे त्यालाच ठाऊक! कारण कष्ट केल्याशिवाय विद्या मिळत नाही.

शिक्षकाने विद्यार्थाला असे ज्ञान द्यायला हवे की ज्यामुळे तो अज्ञान, अंधकार आणि बंधन यातून मुक्त होईल. आदर्श शिक्षक चारित्र्य, नीतिमत्ता, स्वावलंबन, धैर्य, इ.मूल्ये विद्यार्थ्यावर बिंबवितो. त्याला स्वतःच्या पायावर उभे राहण्यासाठी समर्थ बनवितो. त्याला घडवितो, आकार देतो. त्याच्यातील सुप्त कलागुणांच्या विकासाला वाव देतो. विद्यार्थ्याला केवळ परीक्षार्थी न बनविता खऱ्या अर्थाने विद्यार्थी बनवितो, ज्ञानार्थी बनवितो. केवळ अभ्यासक्रमातील विषय शिकवून न थांबता तो विद्यार्थ्याला जीवनावश्यक असे सर्व ज्ञान देत असतो. विद्यार्थ्याकडून अभ्यास करवून घेतो. शिक्षण ही दुतर्फी आणि जिवंत प्रक्रिया आहे. म्हणूनच आदर्श शिक्षक शिकविताना शिक्षण प्रक्रियेत विद्यार्थ्यांनाही सामावून घेतो. त्यांना प्रश्न विचारतो. उत्तरे देण्यास प्रवृत्त करतो. त्यांना वाचन, लेखन, मनन, चिंतन करायला भाग पाडतो. विद्यार्थ्याच्या अडचणी, शंका आणि प्रश्न यांचे निरसन करतो. विद्यार्थ्यात कोणतीही कमतरता, दोष, दुर्गुण राहणार नाही याची काळजी घेतो. विद्यार्थ्याला परका मानत नाही. उलट त्याच्यावर पुत्रवत प्रेम करतो. त्याचे ज्ञानचक्षू उघडून त्याला जगाकडे बघायची आणि जगायची दृष्टी देतो. त्याच्यावर सहकार्य, सेवाभाव, बंधुभाव, सहिष्णुता ही मूल्ये बिंबवितो. आदर्श शिक्षक प्रत्येकाकडून काहीना काही गुण घेत असतो, शिकत असतो. मग समोरची व्यक्ती लहान असो अथवा मोठी. कारण आदर्श शिक्षक हा आदर्श विद्यार्थी असतो. तो विद्यार्थ्याच्या व्यक्तिमत्त्वाचा सर्वांगीण विकास करतो. म्हणूनच भारतीय संस्कृतीत शिक्षकाला (गुरूला) ब्रह्मा, विष्णू, महेशाची उपमा दिली आहे. गुरूला 'परब्रह्म' म्हटले आहे. म्हणूनच गुरू वंदनीय आहे. म्हटलंच आहे ना की, "शिक्षक हा विद्यार्थी परायण असावा, विद्यार्थी ज्ञानपरायण असावा आणि ज्ञान सेवापरायण असावे."

IX मराठीत भाषांतर करा.

भारत की राजभाषा हिंदी है। प्रत्येक राज्य की अपनी राज्यभाषा भी है जो उस राज्य में प्रथम भाषा के रूप में पढ़ाई जाती है और प्रशासन का कार्य भी उसी में चलाया जाता है। चूँकि सभी देशवासियों को किसी भी राच्य में रहने-कमाने का अधिकार है, इसलिए भारत के किसी भी क्षेत्र का निवासी अन्य क्षेत्र में रोज़ीरोटी के लिए जाता ही है। अपने मूल क्षेत्र से दूसरे क्षेत्र में जानेसे वहाँकी भाषा न समझने के कारण उसे कठिनाईयों का सामना करना पड सकता है। यदि भावी निवास-क्षेत्र की भाषा का भी ज्ञान हो तो काफी आसानी हो सकती है। इसलिए सभी भारतवासियों के लिए अपनी प्रथम भाषा के अतिरिक्त देश की किसी अन्य भाषा का ज्ञान यदि अनिवार्य

नहीं तो आवश्यक बन ही जाता है और हिंदी क्षेत्र के निवासियों को हिंदी तो सहज में ही प्रथम भाषा के रूपमें प्राप्त होती है, उन्हें अन्य क्षेत्र की भाषा का भी ज्ञान अर्थात्, लिखना, पढ़ना, समझना आना चाहिए।

जैसे-जैसे हम देश के विविध भाषाओं का समान करेंगे वैसे-वैसे देश की राजभाषा हिंदी के विकास को भी बल मिलेगा। हमें ये बात सदा याद रखनी चाहिए कि, हम भारतीय पहले हैं और मराठी, गुजराती अथवा अन्य भाषा भाषी बाद में। सच्चे भारतीय होने के लिए हमें भारत की समस्त भाषाओं का समान रूप से सम्मान करना चाहिए। ऐसा करके हम भारतीय एकता को मज़बूत करेंगे।

भाषा और संस्कृति का परस्पर गहरा संबंध है। भाषा से ही संस्कृति का विकास होता है। यदि हम अन्य राज्य की भाषा को सीखेंगे तो हमें उस राज्य की संस्कृति का भी ज्ञान हो जाएगा।

X खाली दिलेल्या शब्दांचा वापर करून मराठीत एक-एक वाक्य बनवा.
शाळा, लवकर, शिक्षण, हेडमास्तर, मातृभाषा, संधी, अडचण, अनिवार्य, प्रांत, कठीण

XI

1. आपण कन्नड भाषी आहात. मराठी शिकल्यावर आपण एका सुप्रसिद्ध कन्नड पुस्तकाचे मराठीत भाषांतर केले आहे. त्याच्या प्रकाशनार्थ अर्थसाहाय्यासाठी भाषा संचालनालय, महाराष्ट्र राज्य यांना पत्र लिहा.

2. आपण प्रथितयश मराठी लेखक आहात. एका कन्नडभाषी उदयोन्मुख लेखकाने मराठीत लेखन केले आहे. त्याला त्याच्या प्रयत्नांबद्दल त्याचे कौतुक करणारे पत्र लिहा.

